श्रीसमर्थ सदन-प्रकाशन

२६

# ऐतिहासिक पत्र-बोध

## मराठशाहींतील निवडक पत्रें

## स. १५९६ ते १८१९


संपादक

गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए.

रियासतकार






मूल्य दीड रुपया

# प्रस्तावना

अनेक अभ्यासकाच्या परिश्रमाने मराठी भाषेत जुन्या ऐतिहासिक कागद-पत्राचा फार मोठा संचय प्रसिद्ध झाला असून त्यावरून मराठ्याचा इतिहास आता पुष्कळसा साधार बनला आहे परंतु भाषेच्या दृष्टीनेही या जुन्या कागदाचे महत्त्व काही थोडें नाही मराठीचे प्राचीन वाङ्मय बहुतेक पद्यमय असून त्यातील गद्याची उणीव ऐतिहासिक कागदानी चागली भरून निघते तथापि सामान्य वाचकाचा किवा शाळा–कॉलेजाच्या विद्यार्थ्यांचा या ऐतिहासिक पत्रव्यवहाराशी फारसा परिचय नसतो

या ऐतिहासिक वाङ्मयाकडे वाचकाचे लक्ष न जाण्याची कारणे अनेक आहेत बरीचशी पुस्तके दुर्मीळ आहेत आणि जी प्राप्य आहेत तीं पुष्कळाना विकत सुद्धा सहज मिळण्याजोगी नाहीत शिवाय त्याची रचना अनभ्यस्त वाचकाचे मन आकर्षून घेण्याजोगी नाही. त्यातले कागद तुटक व निरनिराळ्या व्यवहाराचे असल्यामुळे त्याचा संदर्भ सहज लक्षात येण्याजोगा नसतो सर्व कागद कालानु-क्रमाने प्रसिद्ध झाले आहेत असे नाही म्हणून विशिष्ट अभ्यासकापलीकडे हे साधनग्रंथ वापरणारे फार थोडे मी आपल्या रियासतीत अशा कागदाचा शक्य तितका उपयोग केला आहे या कागदाचे काही नमुने स्वतत्र रीतीने वाचकास व विद्यार्थ्यांस सादर करावे अशी कल्पना कैक वर्षे माझ्या मनात घोळत होती माझे मित्र कै वासुदेवराव आपटे ( आनंदकर्ते ) याना ती पसत पडून आम्ही एकत्र बसून एक निवडक यादी देखील तयार केली होती पण इतर व्यवसायात हे कार्य मागे पडत गेले आता थोडीशी सवड मिळताच ते हाती घेतले

या पुस्तकात आपल्या एकदर इतिहासाचे सर्व सार उतरले आहे असे कोणी समजूं नये आपला ऐतिहासिक वाङ्मय-सभार वस्तुतः प्रचड आहे दोन व्यक्ती-मधील पत्राशिवाय त्यात न्यायनिवाडे, करार, निरनिराळ्या कामाच्या याद्या, हिशेब वगैरे अनेक प्रकारचे कागद प्रसिद्ध झाले आहेत पण त्यात वाचकाना गोडी लागेल असा मुख्य भाग म्हटला तर पत्राचाच होय या पत्रातून अनेक ऐति-हासिक व्यक्तीची स्वभाव-चित्रें व घडामोडी पहावयास मिळतात, पूर्वीचे व्यवहार

व रीतरिवाज समजतात निरनिराळ्या लेखकाची भाषाशैली कळते, नवीन शब्द परिचित होतात, अशी एकंदरीत या पत्रानी वाचकाच्या ज्ञानात पुष्कळ नवीन भर पडते

पत्राची निवड करण्याचे काम पहिल्या कल्पनेपेक्षा पुष्कळच अवघड पडले शहाजी शिवाजीपासून दुसऱ्या बाजीरावापर्यंत दोनशे वर्षांच्या काळाचे मुख्य स्वरूप साकल्याने वाचकाचे मनात उतरावे म्हणून या अवधीतील ठळक घडामोडी व त्या बनविणाऱ्या सुप्रसिद्ध व्यक्ती लक्षात घेऊन तशी पत्रे मी स्वीकारली आहेत युद्धाची, जयापजयाची व पराक्रमाची वर्णने वाचण्यास मिळावी, सामाजिक व धार्मिक व्यवहार कळावे, लोकाचें शिक्षण व उमेदी, राष्ट्रीय जीवनात स्त्रीवर्गाचा भाग, भाषेचे नमुने वगैरे प्रकार समजण्याचें साधन हाताशी असावे, अशा हेतूने ही निवड केली आहे सारांश, मराठशाहीचे अंत.स्वरूप व बाह्य व्याप या दोनही गोष्टी या पत्राच्या द्वारा वाचकाच्या मनावर अंशतः ठसतील तर इतिहास शिकण्याचा उद्देश पुष्कळसा सफल होईल

मराठीपेक्षा इंग्रजी भाषेत अशा पत्रमय लेखाची थोरवी फार आहे त्या भाषेत पत्रग्रथाची संख्या प्रचंड असून त्यात खासगी व दरबारी असे दोनही प्रकार नमूद आहेत मराठीत पत्रवाङ्मय एकदरीत अगदी अल्प असले तरी ऐतिहासिक पत्रे भरपूर आहेत मात्र ती वाचताना तत्कालीन भाषा व संकेत आढळतात ते समजून घेतले पाहिजेत प्रत्येक पत्राच्या समजुतीकरिता आरंभीच्या मथळ्याखाली थोडे प्रास्ताविक स्पष्टीकरण दिले आहे ते वाचले म्हणजे पत्राचा मजकूर लक्षात येईल कठिण शब्द व कित्येक संकेताचे खुलासे पादटीपात दिले आहेत पण अशा सर्वच बाबती देऊं म्हटल्यास टीपानीच पुस्तक भरून जाईल आणि विद्यार्थ्यांना स्वत चे श्रम करण्यास काही अवकाश उरणार नाही सबब यासबधाने मुद्दाम आखडता हात घेतला आहे तत्कालीन पत्राचे मायने, कालगणना, वाक्यरचना वगैरे गोष्टी वाचकानी स्वतःच्या परिश्रमाने समजून घेणे इष्ट होईल

पानिपतोत्तरच्या चाळीस वर्षांत मराठी राज्यकारभारावर एका नाना फडणिसाचीच मुख्य छाप असल्यामुळे आणि त्यातही त्याची भिस्त तरवारीवर नसून लेखणीवर असल्यामुळे निवडलेल्या कागदात नानाचे कागद इतराच्या

पत्रांच्या मानाने जास्त वाटले तर ते योग्यच होय दुसऱ्या बाजीरावाच्या अमदानीत राज्यकारभाराचा भर लेखनावर नसल्यामुळे त्या काळचा फारसा पत्रव्यवहार उपलब्ध नाही मात्र तत्कालीन इंग्रजी कागदाचा भरणा पर्वतप्राय आहे

कोणत्याही कागदाची निवड ज्याच्या त्याच्या बुद्धिनुसार होणे युक्तच आहे तेव्हा या पुस्तकात छापली तेवढीच पत्रे चागली असे मानण्याचे कारण नाही प्रसिद्ध झालेल्या कागदात निवडक अशी आणखीही पुष्कळ पत्रे निघतील दिलेले मासले नमुन्यादाखल आहेत, उपलब्ध साधनाचा तो केवळ एक अश होय, असे समजावे

प्रत्येक पत्र कोठून घेतले त्याचा आधार आरंभी दाखविला आहे विद्यार्थ्यांना या ग्रथाची नावे व त्याचे स्वरूप माहीत पाहिजे मराठीत ऐतिहासिक साधनाचे ग्रंथ पाचचारशे तरी आहेत, त्यापैकी पत्रेच तेवढी देणारे मुख्य ग्रथ म्हटले तर राजवाडे यानी प्रसिद्ध केलेले खड २५, खरे यानी ऐतिहासिक लेखसग्रह या नावाखाली प्रसिद्ध केलेले खड १५, पारसनीस यानी प्रसिद्ध केलेले इतिहास सग्रहातील भाग, पुरदरे दप्तरातील कागदाचे भाग आणि अलीकडे पेशवे दप्तरातील सरकारमार्फत प्रसिद्ध झालेले निवडक कागद हे होत त्यातून बहुशी या पुस्तकातील पुष्कळशी पत्रे घेतली आहेत

प्रत्येक पत्रास इग्रजी तारीख दिली आहे मूळ कागदात ही इग्रजी तारीख दिलेली नाही त्या वेळी मुसलमानी अमलातली फारसी कालगणना प्रचलित होती, तीच मराठी लेखकाना स्वीकारली या मुसलमानी गणनेचे तीन प्रकार आहेत, एक सौर गणनेचा आरबी **सुहूर सन, दुसरा फसली व तिसरा हिजरी,** हे दोन चंद्रमासाचे आहेत शिवाय मराठी पत्रात शालीवाहन शक व विक्रम सवत् हेही येतात शिवाजीने आपला राज्याभिषेक शक स्वतत्र चालू केला, पण तो पुढे फारसा वापरात आला नाही ही सर्व कालगणना समजून घेतल्याशिवाय ऐतिहासिक कागदाची मिति निश्चित करिता येत नाही त्यासाठी अनेक कॅलेंडर्स ऊर्फ जत्र्या आहेत त्या अभ्यासकास अवगत पाहिजेत मराठीत अशा जत्र्या दोन, एक खरे याची शिवकालीन शतकाची व दुसरी मोडक याची पेशवेकालीन प्रस्तुतकाल पर्यंतची या दोन तरी हाताशी असल्याशिवाय पूर्वीच्या कागदाची बिनचूक तारीख काढता येणार नाही मुसलमानी महिन्याची बारा नावे व शमर

अक एवढे तरी विद्यार्थ्यांनीं ध्यानात ठेवणे जरूर आहे, ते असे —
मुसलमानी महिने —

**मोहोरम, सफर, रबिलावल, रबिलाखर,**
**जमादिलावल, जमादिलाखर, रजब, साबान,**
**रमजान, सव्वाल, जिल्काद, जिल्हेज.**

मुसलमानी आकडे —

१ इहिदे, २ इसन्ने, ३ सल्लास, ४ आर्बा, ५ खंमस, ६ सीत, ७ सब्बा, ८ सम्मान, ९ तिस्सा, १० अशर—पुढे ११ इहिदे अशर, १२ इसन्ने अशर इ २० अशरीन, ३० सल्लासीन, ४० आर्बैन, ५० खमसैन, ६० सितैन, ७० सब्बैन, ८० सम्मानीन, ९० तिस्सैन, १०० मया, १००० आलफ, मया तैन = दोनशें

थोड्याशा सवयीने ही नावे सहज ध्यानात राहतील या पुस्तकात दाखल केलेली पत्रे लक्षपूर्वक वाचली असता त्यावरून पुढे आणखी मोठे पत्राचे निरनिराळे ग्रंथ समजण्यास अडचण पडणार नाही परंतु कोणताही विषय परिश्रमाशिवाय हस्तगत होत नसतो हे अभ्यासकांनी लक्षात ठेविल्यास, पुढील इतिहाससंशोधनात त्याचा प्रवेश होण्यास हे पुस्तक उपयोगी पडेल अशी माझी धारणा आहे.

**गो. स. सरदेसाई**

कामशेत, ११ ऑगस्ट, १९३९

# अनुक्रमणिका


१ पूर्वीप्रमाणे इनाम चालविणें १
२ भानाबाईवर कृपा २
३ हरामखोर दादाजी ३
४ राज्यास अधिकारी जालों ४
५ मराठ्यांची तों इज्जत वांचणार नाहीं ५
६ गृहकलह बरा नव्हे ७
७ तृणाने अग्नि झाकितां १०
८ पराक्रमाचा तमाशा दाखवा १३
९ स्वामिकार्याचे बक्षिस १५
१० हरामखोरास तंबी १६
११ स्वामीचे मांडीवरी उसे १८
१२ कृष्णमृत्तिकेचे प्रयोजन २०
१३ औरंगजेबास पुत्राचे पत्र २१
१४ इंगळास वोळंबे लागले २२
१५ भद्रकाली कोपली २४
१६ असाधारण सेवाधर्म २५
१७ गिरिधर बहादर बुडविला २६
१८ पृथ्वी स्वामीस वश आहे २६
१९ हट-निग्रह कार्यास येत नाही २७
२० स्वामीच्या आशीर्वादे फत्ते २८
२१ अयत्नी मार्ग ऐसाच आहे २९
२२ तुमच्या आशीर्वादें आम्हांस काय न्यून ? ३०
२३ मीच तुमचा बाजीराव ३१
२४ टोपीकर म्लानत्व पावले ३१
२५ पराक्रमाची सीमा, वसई काबीज ३४
२६ पेशवेकालीन शिक्षण व शिस्त ३८
२७ महादेव भट हिंगण्याचा मृत्यु ३९
२८ घरगुती अडचणी ४०
२९ तुमचे मस्तकी हात ४१
३० निजानंदलेखन ४२
३१ आमच्या सांभालाचा अभिमान ४३
३२ आम्ही कान धरली शेळी ४४
३३ तिलोत्तमाच्या लावण्याचे तीळ ४७
३४ मराठ्यांचा हिंदबाहेर दृष्टिक्षेप ४८
३५ दौलताबाद तुम्हास दुर्घट वाटल्ये ? ५०
३६ तैमूरच्या सलतनतेचा नाश कर्तव्य नाही ५१
३७ पानिपत—स्वारीची आर्थिक कुचंबणा ५३
३८ लाडके व्हाल तें कामाचे नाहीं ५६
३९ भाऊवाचून दुनिया—दौलत व्यर्थ ! ५६
४० नानांचे आत्मचरित्र ५८

४१ लटके मनसबे न करणें ६६
४२ कालचक्रानुसार विपरीतार्थ ६७
४३ चुलते पुतण्यांची एकवाक्यता ६८
४४ आम्हापेक्षां अधिक झाले ६९
४५ दौलतीची वांटणी अनिष्ट ७०
४६ वडिलांप्रमाणें लौकिक करा ७१
४७ सेवकांनीं विनंती मात्र लिहावी ७२
४८ इंग्रजांचे हातीं मोठा किमया ७३
४९ इंग्लंडचे राजास पेशव्याचें पत्र ७६
५० गंगाबाईचा मृत्यु ८०
५१ दौलतींतील तीन पिढ्यांचे फडणीस ८१
५२ ब्राह्मणी दौलत बुडणार ८२
५३ अकृत्रिमपणाचा करार ८३
५४ बंधुत्वाची शपथ-क्रिया ८६
५५ मी काय कुणबी लागलों आहें ? ८६
५६ इंग्रजांस मराठ्यांची दहशत ८८
५७ नानांच्या आयुष्यांतील संकटप्रसंग ९१
५८ चित्रसंग्रहाची हौस ९३
५९ तेरा कलमी उपदेश ९५
६० पाटिलबावांच्या कामाची रीत ९९
६१ आगऱ्याचे बातमीपत्र १०२
६२ घाशीरामाची कोतवाली १०४
६३ फर्मानबाडी, —३ पत्रे. १०६
६४ फर्मानबाडीचा दरबार १०९
६५ हरीपंत फडके यांचा मृत्यु ११२
६६ आनंदीबाईचा मृत्यु ११५
६७ मी आपली धर्माची बहीण ११६
६८ मावळांतील न्याय ११७
६९ नाना—बाजीराव यांचा करार ११९
७० नाना फडणिसाचा मृत्यु १२१
७१ अतुल पराक्रमी सेवक १२२
७२ बाजीरावाची शरणागति १२२
७३ स्वहस्तानें हुंड्या पाठवाव्या १२३
७४ सतीची बंदी १२४

# ऐतिहासिक पत्र-बोध



## १

प. स. वृ. पृ ८८] [स १५९६

## पूर्वी प्रमाणें इनाम चालविणें

[मालोजी राजे यानीं दिलेले खालील इनामपत्र एक जुना ऐतिहासिक पत्राचा नमुना मानतां येईल.]

अजरख्तखाने[1] राजश्री मालोजी राजे फारसी

दामादौलतहू[2] शिक्का

बजानेबां[3] हुदेदारांनी[4] हाल व इस्तकबाल व मोकदमांनी कसबे पेडिगाऊ पा।। मजकूर[9]

विदानंद,[6] सुाँ[7] सबा तिसैन व तिसा मैया[8]

आकोबा गोसावी बिन गोदोबा गोसावी बडवे पुजारे श्री विठ्ठलदेऊ कसबे मजकूर हुजूर येउनू मालूम[10] केले जे. आपणास इनामाबद्दल सदकोबांची[11] जमीन चावर एक तर्री[12] ठाणे व ता देहाय[13] कुलबाब[14] कुलकानू[15] व बाजेपटीयाँ,[16] वेठी व वेगारी कारकीर्द दर कारकीर्द कसबे मजकूर तौं[17] सन सीत[18] चालिले आहे सन सीतामधे वणगोजी[19] आपलिया कदीम[20] हुजती फर्मान व भोगवटे गेले आहेती साहेबी सदरहू इनाम चालवावेया खुर्दखत[21] होय, मालूम जाले

---

१ अज=पासून रख्तखाना=कचेरीची जागा, म्ह० याच्या कचेरींतून २ याचें सुदैव कायम राहो ३ यास ४ हे शब्द जुन्या भाषेंतले अनेकवचनी होत ५ हालीचे व पुढे होणारे ६ जाणावें की ७ सुहूर्सन ८ सत्त्याण्णव व नऊशे. ९ वर सांगितलेला पेडगाव. १० कळविलें ११ ठिकाणाचे नाव १२ तर्फेचें ठाणे १३ तर्फेचे गांव १४ सर्व बाबतीत १५ सर्व नियम १६ दुसरे कर. १७ पावेतों. १८ स ९९६ १९ वणगोजीच्या बटाळीत २० जुनी बाबतवार फर्मानें. २१ लहान चिठी.

आकोबा गोसावी बिन गोदोबा गोसावी वडवे पुजारे श्रीविठ्ठलदेऊ कसबे मजकूर यास इनाम बद्दल चावर एक जमीन ता। सन सीत चालिले असेलीप्रमाणे चालवीजे दरम्यान साल गुा। गेलेया बाबेचा उजूरे न कीजे औलाद[१] व आफलाद चाल्वीजे दर हरसाल ताजे खुर्दखताचा उजूर न कीजे तालिके[२] घेऊन असली खुर्दखत इनामदार मजकुरापाशी दीजे मीका

## २

सनदा पत्रे पृ. १०२ ] [ ३१ जाने० १६०५

## "भानाबाईवर कृपा"

### जिजाबाईने दिलेले इनाम

[ जिजाबाईची ही सनद खरी अमल्याम, तिजवरून दादाजी कोंडदेवाचा करडा कारभार व जिजाबाईची दयार्द्रता व्यक्त होते )

आज्ञापत्र सौभाग्यवती मातुश्री जिजाबाई भोसली मोकदम, कसबे जिती परगणे श्रीगोंदे, कडेवलीत यांनी दानपत्रे वतनावर वतनभाऊ आणि पुरातन चाकर एकनिष्ठ याजवर कृपाळु होऊन, इनाम जमीन सवा चावर बिघे १५० दीडश राजश्री विसाजी रगनाथ सोनटके कुळकर्णी कसबे मजकूर याची स्त्री सौभाग्यवती भानाबाई याजवर कृपाळु होऊन चोळी काकणास म्हणून जमीन नेहर शेरी नजीक शीव बाभूळगाव जमीन बिघे १२० एकशेवीस वंशपरंपरेने अनुभऊन सुखरूप राहणे एकूण येणे प्रमाणे दानपत्रे अजरामर्‍हामत निर्विजल, तरु, पाषाण, चंद्र, सूर्य पावेतो अनभवीत जाणे

राजश्री रगो गणेश सोनटके कुळकर्णी कसबे मजकूर हे हिशेब मोहसब द्यावयास किल्ले कोंडाणा, राजश्री दादो कोंडदेऊ याचे घरी भोजनास बोलाविले भोजन करून खोलीमध्ये बिछाना करून निद्रा केली पाचसहा घटका जाहलीयावर अगाची आगी जाहाली पाणी पाणी करून खोलीत प्राण गेला खोलीस बाहेरून कुलूप होते दुसरे दिवशी खोलीचे कुलूप काढून पाहिले तो

---

१ औलादपुत्रसंतान अफ्लाद् दुहितृसतति, (रा. व्य को २२५) २ नकल

मृत पावले प्राण निघोन गेला. असे वर्तमान जाहले याजकरिता साहेब कृपाळु होऊन, दानपत्रे इनाम करून दिल्ही असे कदीम सेवा केली आहे भोसले याचे वंशी कुटुंब दाखल याचे चालवोन, जे कोणी अंतर करील त्यास श्रीवाराणसीची शपथ असे

शके १५२६ सिध्यर्थीनाम सवत्सरे, माघ शुद्ध सप्तमी रविवार लेखनसीमा

## ३

**ऐ. फा. सा. खंड १ पृ १०]** [१ ऑगस्ट १६४४

# " हरामखोर दादाजी "

**[ शिवाजीच्या उद्योगातील पहिली निश्चित तिथि दाखविणारे खालील फारसी फर्मान महत्त्वाचे आहे हे विजापुरच्या शहाने कान्होजी जेधे यास लिहिलेले असून त्यात दादाजी कोंडदेवाचा उल्लेख हरामखोर असा आहे म्हणजे यापूर्वी थोडे दिवस कोंडाणा उर्फ सिंहगड किल्ला दादाजीने हस्तगत केला होता हे सिद्ध होते हा किल्ला घेऊनच शिवाजीने स्वराज्याचा उद्योग आरंभिला. ]**

ज्या अर्थी शहाजी भोसले यास दरबारातून अप्रतिष्ठेने काढून लावण्यात आले आहे आणि त्याचा मुतालिक दादाजी कोंडदेव याने कोंडाण्याचे बाजूस धामधूम चालविली आहे, त्या अर्थी त्यास शिक्षा करून विलायत ताब्यात घेण्यासाठी खंडोजी व बाजी घोरपडे याची नेमणूक करण्यात आली आहे तरी तुम्ही आपल्या जमावानिशी मशारनिल्हेस सामील होऊन त्याच्या समतीने तो दुष्ट दादाजी व त्या हरामखोराचे साथीदार याना नेस्तनाबूद करावे आणि विलायत ताब्यात आणावी तेणेकरून तुमची सरफराजी होईल

रवाना छ ७ जमादिलाखर सन १०५४ पा। खास हुजूर

## ४

सनदा पत्रे पृ ११३ ] [ १७ जुलै १६५३

# " राज्यास अधिकारी जालों "

**[ शिवाजीच्या स्वतंत्र राज्याची स्थापना केव्हां पूर्ण झाली हे समजण्यास हा कागद उपयोगाचा आहे 'उपाध्यायाच्या प्रसादाने चिंतिले मनोरथ सिद्धीस गेले' हे शिवाजीचे वचन त्याची धार्मिक भावना व्यक्त करते ]**

**श्रीभवानीशंकर**

श्रीसकल तीर्थस्वरूप वेदमूर्ति राजश्री सिद्धेश्वरभट बिन मेघनाथभट ब्रह्मे उपाध्ये, परगणे चाकण स्वामी गोसावी यासी —

आज्ञाधारक राजेश्री शिवाजीराजे बिन शहाजीराजे भोसले साष्टांग दंडवत,

सुर–[ शिक्का ] सन अर्बा खमसैन अलफ

पत्र लेहून दिधले ऐसीजे स्वामीच्या अनुष्ठानबळे आपण राज्यास अधिकारी जालो व सकल मनोरथ चिंतिले पावलो, ऐसा अनुभव आला म्हणून व संकटकाळी साहाकारी जाणोन, पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने स्वामीस वर्षासन होन पातशाई १०० शभरी केले असेत. सदरहू वर्षासन यावत् काळपर्यंत आपले राज्य तावत् काळपर्यंत चालऊन. यासी अन्यथा करू अथवा पुढे कोणी आपले वंशपरंपरेचा होऊन अन्यथा करील, त्यास श्रीजीची व कुलस्वामीची व आपल्या पूर्वजाची व गोब्राह्मणाची आण असे या वेगळे स्वर्गदेवतेच्या पूजनास व श्रीनवचंडीमध्ये जपतप-हवनास व ब्राह्मणभोजनास जे लागेल, त्याची आज्ञा करीत जाणे आज्ञेप्रमाणे प्राप्त करीत जाऊन राज्य स्वामीच्या प्रसादाचे आहे आपण आज्ञाधारक असो जाणीजे

रसानगी : छ १ माहे रमजान मोर्तब सूद असे

रुजू
सुरुनिवीस

---

**संदेशस्तु रसानगी**, (रा व्य. को २९३ )

## ५

**राजवाडे खंड ८ ले. २८ ]** [ १९ मे १६७३

# " मराठ्यांची तो इज्जत वाचणार नाहीं "

**[ शिवाजीची लष्करी शिस्त किती कडक होती हे पुढील पत्रावरून दिसून येते ]**

'मशरुल अनाम राजश्री जुमलेदारानी° व हवालदारानी° कारकुनानी° मु मौजे हलवर्ण, तर्फ चिपळूण, मामले दाभोळ, प्रति राजश्री शिवाजी राजे कसबा चिपळुणी साहेबी लष्कराची विल्हे केली, आणि याउपरी घाटावरी कटक (सैन्य) जावे ऐसा मान नाही, म्हणून एव्हा छावणीस रवाना केले ऐसीयास, चिपळुणी कटकाचा मुक्काम होता, याकरिता दाभोळच्या सुभ्यात पावसाळ्याकारणे पागेस सामान व दाणा व वरकड केला होता तो कित्येक खर्च होऊन गेला, व चिपळुणा आसपास विलातीत † लष्कराची तसवीस व गवताची व वरकड दरएक बाब लागली त्याकरिता हाल ‡ काही उरला नाही ऐसे असता वैशाखाचे वीस दिवस उन्हाळा, हेही पागेस अधिक बैठी पडली परतु जरूर झाले, त्याकरिता कारकुनाकडून व गडोगडी गल्ला असेल तो देववून जैशी तैशी पागेची बेगमी केली आहे त्यास तुम्ही मनास मानेल ऐसा दाणा रातीब व गवत मागाल, असेल तोवरी धुदी § करून चाराल, नाहीसे झाले म्हणजे मग काही पडत्या पावसात मिळणार नाही, उपास पडतील, घोडी मरायला लागतील म्हणजे घोडी तुम्हीच मारिली ऐसे होईल, व विलातीस तसवीस ¦ देऊ लागाल ऐशास लोक जातील, कोणी कुणब्याचे येथील दाणे आणील, कोणी भाकर, कोणी गवत, कोणी फाटे, कोणी भाजी, कोणी पाले, ऐसे करू लागलेत, म्हणजे जे कुणबी घर धरून जीव मात्र घेऊन राहिले आहेत, तेही जाऊं लागतील कित्येक उपाशी मराया लागतील म्हणजे त्याला ऐसे होईल की मोगल मुलकात आले त्याहूनही अधिक तुम्ही, ऐसा तळतळाट होईल ! तेव्हा रयतेची व घोड्याची सारी बदनामी तुम्हावर येईल हे तुम्ही बरे जाणून, शिपाई हो, अगर पावखलक हो, बहुत यादी धरून वर्तणूक करणे कोणी

---

° अनेकवचनी शब्द † विलायतीत=मालकीच्या प्रदेशात. ‡ सुस्थिति § हल्ला.
¦ उपद्रव * पाईचे लोक=पायदळ लोक

पागेस अगर मुलकास गावोगाव राहिले असाल, त्यानी रयतेस काडीचा आजार द्यावया गरज नाही आपल्या जागाहून बाहीर पाय घालाया गरज नाही साहेबी खजानातून वाटण्या पदरी घातल्या आहेती ज्याला जे पाहिजे, दाणा हो, अगर गुरे ढोरे वागवीत असाल त्यास गवत हो, अगर फाटे, भाजीपाले व वरकड विकावया येईल, ते रास घ्यावे, बाजारास जावे, रास विकत आणावे कोणावरही जुल्म अगर ज्यास्ती, अगर कोणासही कलागती करावयाची गरज नाही व पागेस सामा * केला आहे, तो पावसाळा पुरला पाहिजे, ऐसे तजविजीने दाणा रातीब कारकून देत जातील, तेणे प्रमाणेच घेत जाणे, की उपास न पडता रोजबरोज खायाला सापडे, आणि होत होत घोडी तवाना होत ऐसे करणे नसतीच कारकुनाशी धसपस कराया, अगर अमकेच द्या, तमकेच द्या असे म्हणाया धुदी करून खासदार कोठीत कोठारात शिरून लुटाया गरज नाही

हल्ली उन्हाळ्याला आहे तैसे ग्वलक पागेचे आहेत, खण धरून राहिले असतील व राहतील, कोणी आगट्या करतील, कोणी भलतेच जागा चुली रधनाला $ करतील, कोणी तंबाकूला आगी घेतील, गवत पडले आहे अगर वारे लागलें आहे तैसे मनास ना आणिता म्हणजे अविस्ताच § एकादा दगा होईल एका खणास आगी लागली म्हणजे सारे खण जळोन जातील गवताच्या लहळ्यास कोणीकडून तरी विस्तव जाऊन पडला, म्हणजे सारे गवत व लहळ्या आहेत तितक्या एकेक जळोन जातील तेव्हा मग काही कुणब्याच्या गर्दना मारल्या अगर कारकुनास ताकीद करावी तैसी केली, तरी काही खण कराया एक लाकूड मिळणार नाही, एक खण होणार नाही हे तो अवघ्याला कळते या कारणे बरी ताकीद करून खासे खासे असाल ते हमेशा फिरत जाऊन, रंधने करिता, आगट्या जाळिता, अगर रात्रीस दिवा घरात असेल, अविस्ताच उंदीर वात नेईल, ते गोष्टी न हो, आगीचा दगा न हो, खण गवत वाचेल ते करणे, म्हणजे पावसाळी घोडी वाचली नाही तर मग घोडी बाधावी न लगेत खायास घालावे न लगे, पागाच बुडाली, तुम्ही निसूर जालेत, ऐसे होईल या कारणे तपसिलें तुम्हास लिहिले असे

जितके खासे खासे जुमलेदार, हवालदार, कारकून आहा, तितके हा रोखा तपशिले ऐकणे आणि हुशार राहणे वरचेवरी रोजचा रोज खबर घेऊन,

* साठा. $ स्वयपाकाला. § अचानक

ताकीद करून, येणेप्रमाणे वर्तणूक करिता ज्यापासून अंतर पडेल, ज्याचा गुन्हा होईल, बदनामी ज्यावर येईल, त्यास मराठ्याची तो इज्जत वाचणार नाही. मग रोजगार कैसा? खलक समजो जास्ती केल्या वेगळ सोडणार नाही, हे बरें म्हणून वर्तणूक करणे ”

---

## ६

**इ. सं., तंजावरचे राजघराणे, पृ. ३६ ]** [ १ मार्च १६७८

## “ गृहकलह बरा नव्हें ”

**[ शिवाजीनें दक्षिण दिग्विजय केला त्याचीं कारणें व उद्देश खुद्द शिवाजीच्या या पत्रांत त्यानें आपल्या बंधूस कळविले आहेत. ऐतिहासिक दृष्ट्या या पत्राचें महत्त्व विशेष आहे. ]**

### श्री महादेव श्री कुलस्वामिनी.

श्री सहस्रायु चिरजीव अखडित लक्ष्मी अलंकृत राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री येकोजी राजे प्रति

राजश्री शिवाजी राजे, आशीर्वाद.

येथील क्षेम जाणोन स्वकीय कुशल लेखन केले पाहिजे उपरी कैलासवासी माहेबी कैलासवास केला, त्यास आजी तेरा वर्षे जालीं महाराजाचे पैके व जडाव व हत्ती व घोडे व मुल्ख अवघेही राजश्री रघुनाथपंती तुम्हाला राज्यावर बैसवून सपूर्ण राज्य तुमचे हाती दिले ऐशियास आमचा अर्धा वाटा तेरा वर्षे तुम्हीच ग्वादला, आम्ही जरी तुम्हाजवळी मागावे, तर बहुत दूर होतो बऱ्या बोले तुम्ही देणार नव्हा, म्हणून तेरा वर्षे सबुरी केली मनामध्ये ऐसा विचार केला की बरे, महाराजाचे पुत्र तेही आहेत, खाती तोवरी खात मालाचे धनीच आहेत जे समयी आम्हास फावेल, ते समयी आम्ही वेव्हार सागोन घेऊ असे मनी धरोन होतो

ऐशियास, राजकारणप्रसंगे आम्ही कुत्बशहाचे भेटीस भागानगरास गेलो तेथून कर्नाटकात गेलो चजीस आलो चजी घेतली, व येल्रतर्फेचा मुल्ख घेतला, व शेरखानास झगड्यात मोडून गर्दस मेळविले शेरखानाचे हाती मुल्ख होता तेवढाही घेतला त्यावरी मजल दर मजल कावेरी तीरास गेलो तेथून तुम्हास पत्रे लिहिली, की राजश्री गोविंदभट गोसावी व राजश्री काकाजीपत व राजश्री निळोबा नाईक व राजश्री रंगोबा नाईक व तिमाजी यख्तियारराऊ असे भले लोक आम्हापासी पाठविणे, म्हणून तुम्हाला बहुता रीती लेहून पाठविले त्यावरून तुम्ही सदरहू भले लोक आम्हापाशी पाठवून दिले त्या भल्या लोकाशी बहुता रीती घरोबियाचा व्यवहार सागून आमचा अर्धा वाटा आम्हास बऱ्या बोले द्या, म्हणून सागून पाठविले, व त्याबराबरी राजश्री बाळंभट गोसावी, राजश्री कृष्ण जोतिषी व कृष्णाजी सखाजी असे आपले तर्फेनें भले लोक दिल्हे हे भले लोक तुम्हाजवळी जाऊन बहुता रीती बोलिले, की गृहकलह करूं नये, आपला अर्धा वाटा मागतात तो द्यावा असे बोलले

परतु कपटबुद्धि तुम्ही ऐसी मनी धरिली, की या समयात आम्ही थोर राजे झालो आहो. आम्हासी आपण खासा भेटीस येऊन हलमस्त § नरमी बहुत दाखवावी, आणि आमचा वाटा बुडवावा तेरा वर्षे सारे राज्य आपणच खादलें, पुढेही आपणच सारे राज्य खावे अशी बुद्धि मनी धरून वाटियाच्या निवाड्याचा तह न करिता आपण खासाच आमचे भेटीस आलेस. यास आमची व तुमची भेट जाली त्या उपरी आम्ही बहुता रीती तुम्हासी बोलिलो, की आमचा अर्धा वाटा द्या परतु तुम्ही वाटा द्यावा हा विचार मनीं धराचना मग जरूर जाहलें, की तुम्ही धाकटे भाऊ, आपण होऊन आमचे भेटीस आले (त), यास तुम्हाला धरावे आणि वाटा मागावा ही गोष्ट थोरपणाचे इजतीमध्ये लायक नव्हे या निमित्त तुम्हाला चजावरास जावयाचा निरोप दिला तुम्ही चंजाउरास गेलेसी. त्याउपरी गृहकलह वाढवूं नये, वाढविल्याने पहिले युगी पाडव कौरव बहुत बहुत कष्टी झाले, ते सारी भारताची कथा मनात आणून गृहकलह वाढविलियान उभयपक्षी कष्टी होईजेत असे जाणून राजश्री शामजी नाईक व कोन्हेरीपत व शिवाजी शकर या हाती मागते बहुता रीती सागून पाठविले, की तुम्ही व आम्ही

§ हलमस्त = humble but proud,—*Molesworth*

* गुप्तपणें रात्रीं तराफ्यावरून पळून गेले, असें बखरीत आहे

वाटे करून घेऊ, परस्परे समाधाने राहूं परतु तुम्ही दुर्योधनासारखी दुष्ट बुद्धि करून संधि न करावा, युद्ध करावे ऐसेच मनी धरिले ऐशियास आम्हाला रायगड प्राते वहुत काही कार्य होते या निमित्ते चिरंजीव सताजी भोसले व राजश्री रघुनाथपंत व राजश्री हबीरराव असे ते प्राती ठेवून आम्ही स्वार होऊन तोरगळ ‡ प्रातास आलो तेथे अशी खबर ऐकली, की तुम्ही तुरुक लोकाच्या बुद्धीस लागून, आमचे लोकाशी झगडा करावा असे मनी धरून आपली सारी जमेत एकवट करून आमचे लोकावर पाठवून दिलेत ते वालगाटपुरास आले तुमचे लोक चालून आल्यावर तुमचे आमचे लोकात थोर झगडा झाला तुमचे लोक पराजय पावले प्रतापजी राजे व भिवजी राजे * व शिवाजी डबीर असे तिघे धरिले, व किती एक लोक मारिले किती एक लोक पळून दाणादाण होऊन गेले ऐसा समाचार ऐकिला हे ऐकून वहुत नवल असे वाटल, की कैलासवासी महाराज, त्याचे तुम्ही पुत्र, वहुत थोर लोक, ऐसे असून काही विचार करीत नाही, व धर्माधर्म विचारीत नाही असे असता कष्टी व्हाल याचे नवल काय ?

तुम्ही म्हणाल की काय विचार करावा ? तरी ऐसा विचार करावा होता की, अधर्मेकरून तेरा वर्षे आपण सारे राज्य खादले ते खादले आता अर्धा वाटा मागतात तो त्याचा त्यास द्यावा आणि आपण सुखी राहावे, ऐसा विचार करावा होता दुसरा विचार करावा होता की, श्री देवाची व श्रीची कृपा त्यावरी पूर्ण झाली आहे, दुष्ट तुरुकाला ते मारितात आपल्या सैन्यात तुरुक लोकच असता जय कैसा होतो, आणि तुरुक लोक कैसे वाचू पहातात हा विचार करावा होता, आणि युद्धाचा प्रसग पाडावा नव्हता परतु दुर्योधनासारखी बुद्धि करून युद्ध केले आणि लोक मारविले जे जाहले ते जाहले पुढे तरी हट्ट न करणे तेरा वर्षे तुम्ही सारे राज्य खादले ते खादले या उपरी कितेक आमचे आम्ही घेतले असे अरणी, बगरुल, कोलार, होसकोट, सिराळकोट व किरकोळ जागे

‡ फेब्रुवारी स. १६७८ अखेरीस बेल्वाडाचें प्रकरण आटोपून शिवाजी मग तोरगळास गेला व पुढें एप्रिलात पन्हाळ्यास पोचला पत्र बहुधा तोरगळहून लिहिलें असावें म्हणून त्याची अदाजी तारीख १ मार्च स १६७८ समजावी.

* प्रतापजी, भीवजी, सताजी व रायभानजी काका असे शहाजीचे चार दासीपुत्र नमूद आहेत. सताजी प्रथमपासूनच शिवाजीस सामील होता

व चंजाऊर असे जे जागे तुमचे हाती उरले आहेती, ते आमचे लोकाचे हाती देणे, आणि नगद पैके व जडाव व हत्ती व घोडे याचा अर्धा वाटा देणे ऐसा विचार करून आम्हासी संधि करणे तुम्ही ऐसा संधि निर्मलपणे केलीया आम्ही आपणापासून तुम्हाला तुंगभद्रे अल्याड पन्हाळे प्राते तीन लक्ष होनाची दौलत देऊन अथवा आम्हाजवळील दौलत तुम्हाला मानेना, तरी कुत्बशहास अर्ज करून त्यापासून तुम्हास तीन लक्षाची दौलत देऊं असे दोनही विचार तुम्हास लिहिले आहेत या दोनही मधील एक मनी धरून मान्य करणे, हट्टाचे हाती न देणे आपल्यात आपण गृहकलह करावा आणि कष्टी व्हावे याचे काही प्रयोजन नाही या उपरी तरी आमचा आपला संधि व्हावा असे बुद्धि मनी धरून वाटियाचा व्यवहार निर्गमून टाकणे आणि सुखे असणे ग्रह कलह बरा नव्हे आम्ही रीतीने वडीलपणे आजवरी तुम्हाला सागितले आताही सागतो ऐकाल तरी बरे, तुम्ही सुख पावाल, न ऐकाल तरी तुम्हीच कष्टी व्हाल आमचे काय चालते ?

बहुत काय लिहिणे मर्यादेयं विराजते

---

७

**सनदापत्रें पृ. १४९ ]** [ स १६७० ची अखेर

# तृणानें अग्नि झाकितां

## शिवाजीचें औरंगजेबास पत्र —

**[ हिंदूचीं मंदिरे पाडून तीं जमीनदोस्त करण्याचा हुकूम औरंगजेबाने ता ९ एप्रिल स. १६६९ रोजीं जाहीर केला, तदनुसार काशीविश्वेश्वराचे मंदिर पाडून त्याचे जागीं मशजीद बांधिली तदुपरात दहा वर्षांनीं ता. २ एप्रिल स. १६७९ रोजीं समस्त हिंदूकडून जझिया कर वसूल करण्याचा हुकूम औरंगजेबानें फर्माविला, या जुलमी कृत्याचा निषेध करण्याकरितां शिवाजीनें एक तडफदार कानउघाडणीचे पत्र औरंगजेबास लिहिले, त्याचा तर्जुमा प्रसिद्ध असलेला खाली दिला आहे. अस्सल फारसी पत्र ब्रिटिश म्यूझियममध्यें असून त्याखालीं**

**'शिवाजीचा फारसीनवीस नील प्रभु याचे हस्ताक्षर' असा शेरा आहे पहा, सरकारकृत शिवाजी आवृत्ति ४, पृ ३०६.]**

"नेकीची इच्छा करणार, सत्यवचनी शिवाजी, ईश्वराची कृपा व बादशहाची मेहेरबानी, हे सूर्याप्रमाणे प्रसिद्ध आहेत त्याचा धन्यपणा मानून नतर पत्र लिहितो

अभीष्टचिंतन करणार प्रारब्धयोगाने हुजूरून निरोपाशिवाय आलो परतु यथायोग्य सेवेचे सांप्रदायात हजर आहे ती चागली सेवा व उत्तम प्रयत्न, हिंदुस्थान व इराण व तुराण व रूम व शाम येथील बादशहा व उमराव, मोगल व राजे लोक व राणे यास व खेरीज सात मुलखाचे रहाणार व खुषकी व तरी येथील मुशाफर यास जाहीर आहेत त्यापेक्षा आपले अंतःकरण समुद्राप्रमाणे आहे त्यासही विदित जाहलेच असेल याजकरिता कित्येक गाथा ज्यात आबालवृद्धाचे कल्याण राही अशा लिहिल्या जातात.

सांप्रत आम्ही इकडे आल्यावर पादशाही खजिना रिकामा जाहला व सारे द्रव्य खर्च जाले, याजकरिता हिंदु लोकापासून जझिया पट्टीने द्रव्य उत्पन्न करून पातशहातीचा क्रम चालविला आहे, ऐसे ऐकण्यात आले त्यास पूर्वी अकबर बादशहा याणी न्यायाने बावन्न वर्षे राज्य केले, याजमुळे इसवी व दाउदी † व महमदी वगैरे याती खेरीज ब्राह्मण व जैन वगैरे हिंदु लोक याचे धर्म चागले चालले व त्या धर्माचे सस्थापकाविषयी ते बादशहाही मदत ठेवीत होते याजकरिता जगद्गुरु अशी त्याची प्रसिद्धि जाहली, व अशा सद्वासनेच्या योगाने हरएक स्थळी त्याची नजर पडत होती, तेथे यश येत होते व कित्येक मुलुख सर केले

त्याजवर नुरुद्दीन जहागीर बादशहा याणी बावीस वर्षे बादशाही ईश्वरी लक्ष ठेवून केली नतर स्वर्गास पोहाचले शहाजहानसाहेब याणी बत्तीस वर्षे पादशहात करून, उपरात राहिले आयुष्य चागलेपणात घालून निरतर कीर्ति मिळविली येविषयी दृष्टांत, "जो पुरुष जिवत असताना लौकिकवान व मागे ज्याची चागली कीर्ति असा जो, त्याजला अचल लक्ष्मी प्राप्त जाहली," असे आहे

सदरी लिहिले पादशहाचा प्रताप व पराक्रम असा की, त्याणी दस्तुर व वहिवाटी केल्या, त्याचे रक्षण करण्यास अलमगीर फिकीरबंद जाहले ते

† यहुदी

बादशहाही जझियापट्टी घेण्यास समर्थ होते परंतु सारे लहानमोठे आपलाले धर्मावर आहेत ते सर्व ईश्वराचे आहेत, असे जाणून कोणावर जुल्म करावा हे त्याणी मनात आणिले नाही त्याचे उपकाराची कीर्ति अद्याप आहे, व हरएक लहानमोठे याचे मुखी, त्याची स्तुति व आशीर्वाद आहे जशी नियत तशी त्यास बरकत त्या बादशहाची दृष्टि लोकाचे कल्याणात होती हल्ली आपले कारकीर्दीत कित्येक किल्ले व मुलूख गेले व बाकी राहिले तेहि जातात कारण जे खराबी करण्याविषयी कमतर नाही, ते रयत लोक खराब आहेत हरएक महालचे उत्पन्न लाखास एक हजार येणे कठिण असें जाहले बादशाहा व बादशहाजादे याचे घरी दारिद्र्याचा वास जाहला तेव्हा पदरचे मनसबदार व उमराव याची अवस्था कळतच आहे

साराश, शिपाई लोक हैराण, व सौदागर पुकारा करितात, व मुसलमान रडतात, व हिंदु लोक मनात जळतात, आणि कित्येक लोकास पोटास मिळत नाही असे आहे तेव्हा राज्य चालविणे कसे ? त्याजवर जझियापट्टीचा उपद्रव या प्रकारचा, तो पूर्व पश्चिमेपावेतो जाहीर जाहला आहे की, हिंदुस्थानचे पादशहा फकीर व ब्राह्मण व जैन व योगी व सन्यासी व बैरागी व अनाथ, गरीब व थकलेले व पडलेले असे एकंदर लोकापासून जझिया घेतात व यातच पुरुषार्थ असें समजतात, व तैमुर पादशहाचे नाव बुडवितात असे जाहलें आहे अस्मानी किताब म्हणजे कुराण, ते ईश्वराची वाणी आहे त्यात आज्ञा केली, ती ईश्वर जगाचा किवा मुसलमानाचा आहे वाईट अथवा चागला असो, हे दोन्ही ईश्वराचे निर्मित आहेत कोठे महजीद आहे, तेथें त्याचे स्मरण करून बाग देतात व कोठे देवालय आहे तेथे घटा वाजवितात त्यास कोणाचे धर्मास विरोध करणें हे आपले धर्मापासून सुटणे व ईश्वराचे लिहिलेलें रद्द करून त्याजवर दोष ठेवणे आहे येविषयी चागले अगर वाईट, जे पहावे त्यास रद्द करूं नये. पदार्थाची निदा करणे हे पदार्थ करणारावर शब्द ठेवणे आहे न्यायाचे मार्गाने पाहता, जझिया पट्टीचा फायदा केवळ गैर पेशजी सुलतान अहमंद गुजराथी, हा असा गैर चालीने वागला तो लौकर बुडाला त्यास या वृद्धापकाळीं असे बद्ध होणें हे पराक्रमास अगदी योग्य नाही येविषयी दृष्टात जुलूम ज्याजवर जाला त्याणें खेद करून 'हाय हाय' म्हणून मुखाने धूर काढल्यास त्या धुराने जितके लवकर जळेल, तितके जलदीने जळता अग्निही

समंधास जाळणार नाही. अंतःकरण पातकाने मलीन जाले ते स्वच्छ करावें ही चागली सल्ला आहे याजवर हिंदु लोकास पीडा करण्यातच धर्म आहे असे मनामध्ये आले असल्यास, आधी राजा राजसिंग याजपासून जझिया घ्यावा म्हणजे इकडून कठिण नाही उपरात सेवेसी हजीर आहे परतु गरीब अनाथ ते मुंग्या, चिलटासारखे आहेत त्यास उपसर्ग करण्यात काही मोठेपणा नाही पदरची मंडळीही पाहता पाहता अग्नि तृणाने झाकितात याचे आश्चर्य वाटते अस्तु. राज्याचा सूर्य हा प्रतापाचे उदयाचलापासून तेजस्वी असो ”

---

## ८

**इ. स.,-तंजावरचें राजघराणें पृ ४२ ]** [ जाने० १६८०

# पराक्रमाचा तमाशा दाखवा

**[ शिवाजीनें दक्षिण दिग्विजय करून सावत्र बंधु एकोजी यास आपल्या हुकमतींत आणिलें, त्यामुळे एकोजी उदास होऊन दु.ख करूं लागला, हे वर्तमान समजल्यावर शिवाजीनें त्यास समजुतीचे व समाधानाचे खालील पत्र मृत्युपूर्वीं थोडे दिवस लिहिले. बंधूनें यवनाची सेवा न करिता वडील बंधूच्या आज्ञेत वागावे असा भाव पत्रांत व्यक्त केलेला आहे. ]**

‘ श्रियासह चिरजीव अखडित लक्ष्मीअलंकृत राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री महाराज एकोजी राजे

प्रती राजश्री शिवाजी राजे आशीर्वाद

येथील क्षेम जाणोन स्वकीय कुशल लेखन करणे विशेष कित्येक दिवस झाले, तुमचे पत्र येत नाही याकरिता समाधान वाटत नाही साप्रत राजश्री रघुनाथपती लिहिले की, तुम्ही आपले ठायीं उदासवृत्ति धरून पहिलेसारखे आपले शरीरसंरक्षण करीत नाही सणवार उत्सवादि हेही काही करीत नाही. सेना बहुत आहे, परतु उद्योग करून कार्य प्रयोजन करवावें, हेही काही करीत नाही वैराग्य धरिले आहे एखादे तीर्थाचे जागी बसून कालक्रमण करू ऐशा गोष्टी सागता, म्हणोन विस्तारे लिहिले होते

तरी या गोष्टी आम्हास बहुत अपूर्व वाटल्या की, कैलासवासी स्वामींनी कसे कसे प्रसग पडले ते निर्वाह करून यवनाच्या सेवा करून, आपल्या पुरुषार्थे बाजी सवारून, उत्कर्ष करून घेतला शेवट बरा निर्वाह केला ते सर्व तुम्ही जाणता त्याच्या साह्यतेस त्याच्या बुद्धियुक्ती सर्वही तुम्हास उपतिष्ठोन त्यापासून शहाणे जाले आहा त्याउपरी आम्हीही जे जे प्रसग पडले ते निर्वाह करून कोणे तऱ्हेने राज्य मिळविले हे जाणता व देखत आहा

असे असोन तुम्हाला ऐसा कोणता प्रसंग पडला जे इतक्याच मध्ये आपल्या ससाराची कृतकृत्यता मानून, नसते वैराग्य मनावरी आणून, कार्य प्रयोजनाचा उद्योग सोडोन, लोकाहाती रिकामेपणी द्रव्य खाऊन नाश करवणे, व आपल्या शरीराची उपेक्षा करणे हे कोण शहाणपण व कोणती नीती? आम्ही तुम्हास वडील मस्तकी असता चिता कोणे गोष्टीची आहे? याउपरी सहसा वैराग्य न धरिता मनातून विपण्णता काढून कालक्रमणा करीत जाणे सणवार उत्साह पूर्ववत् करीत जाऊन तुम्ही आपले शरीरसरक्षण बरे करीत जाणे जमेती सेवक लोकाना रिकामे न ठेवून, कार्य प्रयोजनाचा उद्योग करून त्यापासून सेवा करून पुरुपार्थ व कीर्ति अर्जणे तुम्ही त्या प्राते पुरुपार्थ करून सतोपरूप असलिया, आम्हास समाधान व श्लाघ्य आहे की कनिष्ठ बधु असे पुरुपार्थी आहेती रा रघुनाथ पडित त्या प्राते आहेती ते काही इतर नव्हेती, आपले पुरातन, तुम्हासी रीतीने वर्तावे हे निपुण जाणितात आम्हास मानितात तसे तुम्हास मानितात आम्ही त्याचे ठायी विश्वास ठेविला आहे, तैसा विश्वास तुम्हीही ठेवून काय प्रयोजनास परस्परे अनुकूल व साह्य होऊन वर्तत जाणे पुरुपार्थ व कीर्ति अर्जणे रिकामे बैसोन, लोकाहाती नाचीज खाववून, काल व्यर्थ न गमावणे कार्यप्रयोजनाचे दिवस हे आहेती वैराग्य उत्तरवयी कराल ते थोडे आज उद्योग करून आम्हासही तमासे दाखविणे

बहुत काय लिहिणे, तुम्ही सुज्ञ असा.'

९

राज. खं. १५ ले. ३६५ ] [ २३ जून १६८५

# स्वामिकार्याचें बक्षीस

[ शिवाजीचा सुप्रसिद्ध सरदार येसाजी कंक व त्याचा पुत्र यांस लढाईंत जखमा लागल्या, सबब संभाजी महाराजांनी त्यास बक्षीस दोन हजार होन (एक होन = ३॥ रुपये ) दिले त्याचें हे नेमणुकीचें पत्र सहीशिक्क्यानिशी लिहून दिलेले स्मरणीय आहे संभाजीचा शिक्का आरंभीं व शेवटी लेखनालंकार ही त्याची स्वतःची अक्षरें होत त्या काळी हल्लीप्रमाणे सही करीत नसत शेवटचें मोर्तब त्याचेंच दुसरी पत्र वार झाल्याचा उल्लेख शेवटी आहे नीलकंठ मोरेश्वर पिंगळे संभाजीचा प्रधान होता त्याचाही शिक्का पत्रावर आहे ]

श्री

**श्रीशंभोः शिवजातस्य मुद्रा द्यौरिव राजते ॥**
**यदंकसेविनो लेखा वर्तते कस्य नोपरि ॥**

पत्र नियत पारितोषिक § मा। येसाजी कंक सरनोबत व कृष्णाजी येसाजी कंक पदातिनायक शक १२ क्रोधन नाम संवत्सरे आषाढ शुद्ध द्वितीया सोमवासर सु॥ सीत समानीन अलफ मा। निल्हेनी † व कृष्णाजी कंक मा। निलेचे पुत्र या दोघांनी फोंडाचे स्वारीस फिरंगी यासी गांठी पाडिली तेव्हा बहुत कस्त केली आणि गनीम मारून काढिला ते वख्ती दोघांलाही जखमा लागोन चकाचूर जाले कठिण जखमा राजश्री स्वामींनी दृष्टीने पाहिल्या, आणि घरासी जावया आज्ञा दिल्ही त्यावरी कृष्णाजी कंक याच्या जखमा फुटोन घरीं मयत जाला हाली येसाजी कंक हे हुजूर येऊन आपले वर्तमान विदित केले, त्यावरून स्वामी कृपाळु होऊन हे कामाचे मर्दाने स्वामिकार्यावरी ततपर आणि याचा पुत्रही स्वामिकार्यावरी मयत जाला फोंडाचे बकसीस द्यावयाचे होतें म्हणौन छ मजकुरी पारितोषिकाची मोईन केली होन पादशाही वेरीज २००० दोनी सहस्र होन रास, पा॥*

§ बक्षीस † मशार निल्हे=वर मागितलेले * पैकीं।

खासा येसाजी कंक मरनोबत होन १०००

कृष्णाजी कंक मानिलेचे पुत्र
स्वकार्यावरी पडिले ह्मणोन
दिल्हे होन पा। १०००

येणेप्रमाणे एक साला ये वर्षी पारितोसिक द्यावयाचा नियत केला असे.
लेखनालकार

**श्री शंभु नरपति हर्षनिदान मोरेश्वरसुत नीळकंठ मुख्य प्रधान**

मर्या
देयं विज
यते

तेरीख ३० रजब

सुा। सीत
बार

मुरु सुद\बार

## १०

**राज. खं. १५ ले. ३४२]** [५ ऑक्टो १६८५

# "हरामखोरास तंबी"

श्री

**[ मावळचा देशमुख कान्होजी जेधे शहाजीचा साह्यकर्ता होता. त्याचा पुत्र बाजी सर्जेराव हा प्रथम शिवाजीची सेवा करून पुढें संभाजीचे कारकीर्दीत मोगलांस मिळाला त्यास तंबी देणारें हे पत्र संभाजीने लिहिलेलें तत्कालीन स्थितीचे निदर्शक आहे ]**

[ श्री ॥ शभु भजनोत्कंट मोरेश्वरसुत नीळकठ ]

---

* प्रधानाचा शिक्का अष्टकोनी

स्वस्ति श्री राज्याभिषेक शक§ १२ क्रोधन नाम संवत्सरे आश्विन बहुल त्रितीया इंदुवासरे क्षत्रियकुलावतंश सिंहासनाधीश्वर श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी

सर्जेराऊ जेधे यासी आज्ञा केली ऐसे जे. तुम्ही संताजी निंबालकर मुद्राधारी विचित्रगड यासी पत्र लेहून आपला मुद्दा सागोन पाठविला, कीं आपला भाऊ शिवाजी जेधा याणे हरामखोरी करून सिरवळास गेला त्यानें आपली गुरे ढोरें वळुनु नेली. पुढें आपणास बरे पाहाणार नाही, याबद्दल आपणही उठोन सिरवलास आलो आहे ऐसियासी आपण राजश्री स्वामीच्या पायाजवळी एकनिष्ठच आहे स्वामी कृपाळु होऊनु आपले वतन देशमुखी आपले स्वाधीन करतील आणि अभयपत्र सादर होईल तरी आपण शेवेस एउनु शेवा करीन म्हणून, तरी तुमचा मुद्दा मा। निंले हवालदार एही स्वामीचे शेवेसी हुजूर लिहिला त्यावरून कळो आला त्यावरून हे आज्ञापत्र तुम्हास लिहिले आहे तरी आधी तुम्हीच सरासरी हरामखोरी केली की वतनदार होउनु इमाने इतबारें वर्तावे ते गोष्ट न करिता, स्वामीचे अन्न बहुत दिवस भक्षिले त्याचे सार्थक केलेत कीं स्वामीच्या पायासी दुर्बुद्धि धरून दोन दिवसाचे मोगल त्याकडे जाउनु राहिलेस. तुमचा भाऊ शिवाजी गनीमाकडे गेला तो तुम्हास बरें पाहे ना ऐसे होते तरी तुम्ही स्वामीसन्निध हुजूर यावे होते, म्हणिजे तुमचे इतबारपण कळोन एकनिष्ठता कळो एती ते केले नाही तरी बरीच गोष्ट जाली या उपेरीही गनीमाकडे राहाणेच असेली तरी सुखेच राहाणे तुमचा हिसाब तो काय आहे! एक्षणी स्वामी आज्ञा करितात तरी गनीमा देखील तुम्हास कापून काढवीतच आहेत हें बरे समजणे दुसरी गोष्ट की तेथे राहणेच नाही, एकनिष्ठेनें स्वामीच्या पायाजवळी वर्तावें ऐसे असेली तरी तुम्ही परभारे मुद्दे सागोन गडकिलियाकडे राबिते † काय म्हणून करिता? ही गोष्ट स्वामीस मानत नाहीं जो राबिता करणे तो स्वामीकडेच करून हुजूर वर्तमान लेहून पाठवावे स्वामी तुमचा मुद्दा मनास आणून आज्ञा करायाची ते करतील तरी ऐसी गोष्ट करावयास प्रयोजन नाहीं उजराती खेरीज* दुसरियाकडे एकंदर राबिता न करणे जे वर्तमान लिहिणे ते स्वामीस लिहित

§ शिवाजीनें आपला नवीन शक ६ जून १६७४ रोजीं राज्याभिषेकसमयीं चालू केला.

† संधान. * हुजूर शिवाय.

जाणे. तुमचे ठायीं एकनिष्ठाच आहे ऐसे स्वामीस कळलियावरी जे आज्ञा करणे ते करून आज्ञापत्र सादर होईल तेणे प्रमाणे वर्तणूक करणे लेखनालंकार

| | | |
|---|---|---|
| रुजू | लेख | मर्या |
| रवाना छ ३ जिल्हेज सुरू सूद | नावाधि | देयं विज |
| | मुद्रा | यते |

---

## ११

राज. खं ८ ले. ४७ ] [ स १६९४

## " स्वामींचे मांडीवरी उसें "

श्री

**[ ऐतिहासिक व्यक्तींचे स्वभावभेद कळण्यास अशीं पत्रें उपयोगी पडतात. रामचंद्रपंतास लिहिलेल्या खालील पत्रांत संताजीचा तडफदार पण एककल्ली स्वभाव निदर्शनास येतो. ]**

राजश्री पंत अमात्य स्वामीचे सेवेसी,

सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य,

स्नेहांकित संताजी घोरपडे सेनापति जसन्मुल्क दडवत विनंती येथील कुशल तो प्रताप स्वामीचा जाणऊन स्वानंदवैभव लेखन केले पाहिजे विशेष. स्वामीनी राजश्री सेखोजी बरगे व बाजी शिंदे याजबराबरी कितेक बुद्धिवाद सागोन पाठविला की आपली भेट घेतली नाही परस्पर निघोन गेलेत म्हणून शब्द लाविला. ऐसियास, स्वामीची आमची क्रिया ऐसी नाहीं जे स्वामीस द्वैतवाद धरावा आम्ही त्या प्राते असता दहाविसाचे साक्षीनसी ऐकिलें कीं संताजी घोरपडे यास त्या प्राते ठेवून राजश्री धनाजी जाधवराऊ यास पाठवून देणें, म्हणवून पत्रे राजश्रीस लिहिलीं त्यावरूनच द्वैतपदार्थ दिसून आला. स्वामीचे आज्ञेवितरिक्त आम्ही कांहीच नव्हतो. विश्वासाची जाती म्हणावी तरी स्वामीचे आमचे शफत तळशीबेलाचे श्रीवरील आहे. स्वामीचे माडीवरी आम्ही उसे

ठेवून निजावे, आमचे माडीवरी स्वामींनीं उसें ठेवावें, शरीर मात्र भिन्न आत्मा एक, ऐसें असता ही गोष्ट द्वैताची होऊन आली. म्हणूनच वीतरागें येणें जाले. गत वर्षापासून श्रमाची जाती म्हणावी तर कागदी लिहिता पुरवत नाहीं बरें! जे गोष्टी जाहाली ते जाहाली. याउपरि तऱ्ही राज्यात डोहणा* न होय तो पदार्थ केला पाहिजे. द्वैतभाव दिसोन आला होता म्हणऊनच येणें जाहले होतें. त्यास राजश्री सेखोजी बरगे व बाजी शिंदे याजपाशी स्वमुखें सागितलें की, आपण काही संताजीस ठेवून घेऊन धनाजी जाधवराऊ यास पाठवणें ऐसे लिहिले नाही, म्हणऊन शफतपूर्वक सागितले त्यावरून बाजी शिंद्याचे साक्षीनसी मशारनिलेनी आम्हास सागितले वरकडही कितेक भावार्थ व मानाजी मोऱ्याचे वर्तमान व आणिखी स्नेहाची उत्तरे सागोन पाठविली त्यावरून द्वैताची गोष्टी होती ते स्वामीचे वचनावरून दूर केली आम्ही लोकाचे बळे द्वैत धरिलें होतें ते आम्हापासूनच अंतर पडले. आपणही त्या गोष्टीचा काही मनात विकल्प धरिला न पाहिजे आणखी स्वामीनीं एक शब्द लाविला कीं, राजश्री छत्रपति स्वामीची भेटी जाहली ते समयी बहुमान जाहाला, तेव्हा आमचा मान काढिला नाही. म्हणून शब्द लाविला ऐसियासी, राजश्री छत्रपति स्वामीची व आमचीं जीं वचने स्वामींचे सीहुरसीची§ जाहाली, काय काय चाकरी केली असेल ते एक श्री जाणे कोणे गोष्टीस अंतर पडिले नाही आम्ही ऐसे सेवक नव्हे जे स्वामीचें स्मरण न करिता आधी आपला बहुमान घेऊं याचा पर्याय कागदी काय म्हणून लिहावा! भेटी अंती कळो येईल तुम्ही आपले स्मरण राजश्रीपाशी घेतले नाही, परंतु अलीमर्दीखान घेतला म्हणून ऐकिले विजयी वस्त्रें पाठविली म्हणून लिहिलें त्यावरून अपूर्व वाटलें! स्वामी वडील, हे यश येते ते स्वामीचेच पुण्येकडून येते आमचा अभिमान सर्व गोष्टीचा स्वामीस पूर्वीपासूनही आम्हास स्वामीनेच गौरविलें तेथे वस्त्राचेच काय म्हणून आम्ही ल्याहावें! पूर्वीपासून अंगीकार आमचा स्वामीनी केला आणि बंधु म्हणविले, तोच सिद्धी पाविला पाहिजे. वरकड विस्तारें ल्याहावें तरी लिहिजेसारखा पदार्थ नाही राजश्री सेखोजी बरगे व बाजी शिंदे मुखवचने सागतील ती वचनें आमचींच ऐसे जाणून, श्रीशिवनाथदेव कृष्णेपाशी आहे, तेथें आपण आलें पाहिजे आम्ही येऊन स्वामीची आमची भेटी होऊन श्रीचे व कृष्णेचे साक्षीनसी बेल तुळशी

---

* बखेडा. § सौरस्य, स्नेह

होतील. मग जो विचार करणें तो केला जाईल. स्वामीवितरिक्त आम्ही कांहीं नाहीं. जैसी पूर्वी आज्ञेप्रमाणेंच वर्तणुक केली तैसीच करूं. कळलें पाहिजे

श्रीराजारामचरणीं तत्पर । संताजी घोरपडे निरंतर. विलसति लेखनावधिः

---

# १२

**पुरंदरे दप्तर भा० १ ले. २१ ] [ ३० ऑगस्ट १७०२**

## " कृष्णमृत्तिकेचें प्रयोजन "

**[ स. १७०२ त औरंगजेबानें सिंहगडास वेढा घातला असतां पुणें प्रांताचा सरसुभेदार बाळाजी विश्वनाथ यानें किल्ल्याच्या बचावाची शिकस्त केली, ही गोष्ट पुढील पत्रांत व्यक्त होते. हें पत्र काशी विश्वनाथ व अंबाजी पुरंदरे यांस बाळाजीनें लिहिलेलें आहे. पुरंदरे व बाळाजी विश्वनाथ यांचा घरोबा पूर्वीपासून होता हें या पत्रावरून समजतें. ]**

राजश्री कासीबा व आबाजीपंत यासी, सेवक बालाजी विश्वनाथ नमस्कार विनंति उपर तुमचे काही प्रयोजन आहे तर पावताच येऊन भेट घेऊन सवेच जाणे राजश्री सेनापतीचा कागद पाठविला आसे जरूर काम आसे तर आधी येणे. साराऊश कृस्ण म्रुतिकेचे † राजश्री सेनापतीस फार जरूर लागले आहे यास ये प्रसंगी भगीरथ प्रेत्न करून पके २।। आडीच मण कृस्ण म्रुतिका मेळऊन, देणे याचे देऊन तुम्ही येकजण स्थलास जाऊन हर इलाजे घेऊन येणे. येकजण पुढे येणे यामुळे बहुत कार्य आनकूल आहे जिवावरच खेल करणे आजचे उद्यावर कार्यास न ये रा भिवाजीपंत ईश्वरे नेले याउपर मऱ्हाठा आज कूल ( आनकूल ? ) रक्षिता तरच तुमचे राहणें या मुलकात होऊन सर्वही आनकूल होते भगीरथ प्रेत्न करून आडीच मण पके वजन आज उद्याचे दिवसात येई यैसे करणे बहुत काय लिहिणे हे विनति

---

† कृष्णमृत्तिका=काळी माती, बंदुकीची दारू.

१३

**मनूची, स्टोरिया मोगार, भा. ४ पृ. १७१ ] [ स. १७०३**

# औरंगजेबास पुत्राचें पत्र

**[ औरंगजेबाचा पुत्र अकबर बापाविरुद्ध बंड करून स. १६८१ त दक्षिणेंत संभाजीच्या आश्रयास आला. सहा सात वर्षें त्यानें औरंगजेबाला बादशाही पदावरून काढण्याचा कसून प्रयत्न केला, तो सिद्धीस न जाऊन त्याला प्राण वांचविण्यासाठीं इराणांत पळून जावें लागलें. तिकडेच तो पुढें स. १७०४ त मरण पावला. त्याला आणण्यासाठीं औरंगजेबानें इराणांत माणसें पाठवून पत्रेंही अनेक रवाना केलीं. बापाच्या पत्राला जबाब म्हणून अकबरानें एक विस्तृत पत्र पाठविलें तें मनूचीच्या ग्रंथांत भाग ४ पृ. १७१–१७७ येथें दाखल आहे. त्या पत्रांतील खालील उतारा भाषांतर रूपानें दिलेला बोधपर वाटेल. ]**

'बाबा' तुमचेंच उदाहरण मी नेहमीं डोळ्यापुढे ठेविले आहे. इतके चागलें उदाहरण दुसऱ्या कोणाचे सापडणार? ज्या राजपुतानी अकबर, जहागीर, व शहाजहान यास मनापासून साह्य केलें, त्याचा आश्रय मीं केला, यात वाईट तें काय केले? जशवंतसिंह तुमच्या भुलथापास भुलला नसता तर तुम्ही आज हिंदुस्थानचे बादशहा राहिले नसता असे हे राजपूत लोक आपल्या राज्याचे खाब होते. पूर्वी फौजेंत राजपूत शिपाई पाहिजे असले म्हणजे एकाचे ठिकाणी शंभर उमेदवार पुढें येत हल्लीं तुम्ही तीन तीन वर्षें डागोरा पिटूनही दहा पाच माणसें देखील जमा होत नाहीत, हा परिणाम कशाचा? आज तुमचे अंमलदार इतके आहेत, पण एकाची तरी तुमच्यावर खरी भक्ति आहे काय? फौजेंतील सर्व लोक दरिद्री झाले आहेत, कोणापाशी हत्यार नाहीं एक कवि किंवा ग्रंथकार तुमच्या आमदानींत निपजला नाहीं व्यापरी धनिक म्हणून आहेत त्याची दिवसाढवळ्या लूट होते, त्याचे खून पडतात. रयत तर धुळीस मिळाली विजापूर गोवळकोंडा येथील राज्याचा दक्षिणचा प्रदेश जो पूर्वी तुम्हास अत्यंत संपन्न व स्वर्गतुल्य वाटत होता, तो आता ओसाड, कंगाल व निर्धन बनला आहे. विजापूर, औरंगाबाद वगैरे शहरें केवढीं धनाढ्य, विस्तृत व शोभिवंत होतीं, पण हल्लीं तेथें धुळीशिवाय जास्त काय आहे, तुम्हीच सांगा. ह्या

सर्वांचे कारण काय तर तुमचा परधर्मद्वेष. तुम्हीं हिंदूंवर जिझिया बसविला, त्याने लोक सर्व तुमच्यावर उठले, जाळपोळ व लूट करूं लागले, त्यानेच देश धुळीस मिळाला.

'तुमच्या राज्यात एक तरी प्रकार असा आहे काय की ज्याची मला तारीफ करिता येईल ? थोर थोर पुरातन घराणी सर्व नामशेष झाली. सर्वच लुच्चाचा बाजार भरला आहे सगळा राज्यकारभार हलकट लोकाच्या हातात आहे. हातात जपमाळ, काखेत कुराण, आणि डोक्यास मोठेसे मुंडासे असले म्हणजे त्यावर तुमचा पूर्ण भरंवसा अशी मंडळी तुमच्या राज्याचे आधारस्तंभ !

'असा सर्व राज्याचा नाश झालेला मला पाहवेना, तेव्हा अत्यंत कष्टाने मी देशत्याग करून इकडे आलो आता मी शात आहे परमेश्वर तुम्हाला दीर्घायुष्य देवो मीच परत येऊन राज्य करावे म्हणता, तरी तुम्ही राज्य सोडून मक्केस चालते व्हा, म्हणजे मी येऊन दाखवितो कसे राज्य करावयाचे ते. आजपर्यंत काय करामत होती, ती सर्व तुम्ही करून दाखविलीत आता वृद्धापकाळी परमार्थसाधनच तुम्हास योग्य आहे. ज्यास्त लिहून तुम्हास त्रास होईल म्हणून पत्र पुरें करितो '

---

## १४

**वा. इ. वि. शके १८३७ पृ. २९८ ]** [ १९ एप्रिल १७०५

## " इंगळास वोळंबे लागले "

**[ स. १६८९ त औरंगजेबानें संभाजीचा वध केल्यावर रायगड घेतला. येसूबाई व पुत्र शाहू यांस सपरिवार आपल्या छावणींत कैदी ठेवून १७ वर्षे ठिकठिकाणीं फिरविलें. त्यांच्या चरितार्थास जरूरीपुरता तनखा बादशाहनें नेमला होता. उत्तरोत्तर बादशहाची हीनावस्था होऊन येसूबाईचा तनखा वेळेवर पोचेनासा झाला. त्या संकटकालीं तिनें आपली हकीकत चिंचवडचे मोरया देव यांस पुढील पत्रांत कळविली आहे. ]**

राजश्री श्रीदेव § स्वामींचे सेवेसी आज्ञाधारक मातुश्री येसूबाईसाहेब दोनी करकमल जोडून वैशाख शु० सप्तमी मुकाम अमदानगरी दुर्गांत यथास्थित

§ चिंचवडचे साधु उपनाव देव.

असें विशेष आमचे वर्तमान तरी स्वामीपाशी सत्यच लेखन केले पाहिजे. चिरंजीव दाजी * तो पृथ्वीपतिसमागमे गेले आम्हास सार्वभौमाची आज्ञा जाली की अहंमदनगरास जावे आज्ञेप्रमाणे आम्हास येथें घेऊन आले. येथें आलियावरी आजी पाच मास जाले परंतु खर्चाची बहुत तंगचाई जाली काय निमित्य तरी सार्वभौम दूर गेले आमचा तनखा जो दिल्हा तेथे ताम्रानी व हरिभक्तानी व काहीं काळाने करून प्रतिकुलता जाली त्यामुळे द्रव्य येणें राहिलें येथे अंमदानगरी साहुकाराचे पाच सात सहस्र ब्रह्मस्व जाले. आता कोणी देत नाही मागल्याच पैक्यास तगादे लाविले आहेत त्याच्यामुळे बहुत कष्टी होतों. तो दुःखसागर स्वामीस काय म्हणून ल्याहावा ! मग जरूर जाणोन स्वामीच्या सेवेसी रायाजी जाधव पाठविला असे तरी महाराज कै० स्वामी गेल्या तगाईत आपणावरी हा कसाला $ प्राप्त जाला, इंगळास वोळवे लागले बरे होणार भविष्य त्यास यत्न काय आहे ? आता एक स्वामी व्यतिरिक्त आणीक कोणाचा भरंवसा या समयात नाहीं एक स्वामीच क्लेश परिहार करितील, इतराच्याने काहीं होणे नाही तरी साराश गोष्टी की ब्रह्मस्वापासून मुक्त केलीयानें बहुत कीर्ति स्वामीची आहे, आणि पाऊस पाणी जालीयावरी स्वामी ज्यापासून देवितील त्यास प्रविष्ट करूं परंतु हा समय आम्हावरी कठिण पडला आहे, आपलें कोणी येथे प्रतिपालक नाही ऐसा प्रसंग प्राप्त जाला आहे. याचें निवारण करणार स्वामी आहेत माझी उपेक्षा केली न पाहिजे वरकड चिरंजीवाकडील समाचार व आमचें वर्तमान रायाजी मुखातरी चरणापाशी विनंति करिता श्रुत होईल ते सत्यच मानणें विशेष ल्याहावे तरी आपण अज्ञान मूढ असे. लिहिता येत नाही. अवाक्षराची क्षमा केली पाहिजे. कृपा आशीर्वाद निरतर करीत गेले पाहिजे जाणीजे मोर्तबसुद सेवेसी मातुःश्री सकवार आऊसाहेब † साष्टाग दंडवत. लिहिला अर्थ परिसीजे हे विज्ञापना सेवेसी सेवक बसवंताने § चरणावरी मस्तक ठेवून सा। दंडवत विनंती मी सेवक असे आशीर्वाद पत्र पाठवीत जाणे हे विनंति

---

* शाहूराजे दाजी. $ कसाला=कहर. † सकवारबाई शिवछत्रपतीची बायको (गायकवाडांकडील) बादशहाचे कैदेंत होती. § बसवत खोजा शाहूचा विश्वासु सेवक.

# १५

सरदेसाई स्मारक ग्रंथ पृ. १७१ ] [ स. १७०७

## " भद्रकाली कोपली "

[ शिवभारतकार कवि परमानंद याचा नातू गोविंद परमानंद छत्रपतींच्या पदरीं कवि होता. त्यानें केलेलीं कित्येक कवनें प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांपैकीं खालील ओव्या ताराबाईनें औरंगजेबाशीं युद्ध केलें त्यासंबंधाच्या आहेत. त्यांवरून ताराबाईची तत्कालीन योग्यता समजते. ]

'श्री गोविंदो जयति'

तुलजा प्रसन्न झाली । पातशाही हाती आली ।
जयलक्ष्मी माळ घाली । शिवाजीस आदरे ॥ १ ॥

दिल्ली झाली दीनवाणी । दिल्लीशाचे गेले पाणी ।
ताराबाई रामराणी । भद्रकाली कोपली ॥ २ ॥

जाणा तुम्ही आजि साची । आज्ञा आली शंकराची
सर्व सेना दिल्लीशाची । अंतकास वोपली ॥ ३ ॥

मानहानि दिल्लीद्राची । सभा हासते इंद्राची ।
आजि काल कवीद्राची । सर्व चिंता हारली ॥ ४ ॥

रामराणी भद्रकाली । रणरंगी क्रुद्ध झाली ।
प्रलयाची वेळ आली । मुगल हो साभाळा ॥ ५ ॥

वसे रत्नसिहासनी । भोसल्याचा शिरोमणि ।
शिवराज चिंतामणी । दिनमणि उदयें ॥ ६ ॥

---

*

१६

ऐति. पत्र व्यवहार ले. ५ ] [ २४ ऑगस्ट १७११

# " असाधारण सेवाधर्म "

**[ धनाजी जाधव यानें मराठेशाहीचा बचाव करण्यांत किती कष्ट सोशिले हें खालील उताऱ्यांत दिसून येतें. हें पत्र दुसऱ्या शिवाजीची मातुश्री ताराबाईनें धनाजीचा पुत्र चंद्रसेन जाधव यास लिहिलेलें असून त्या लांब पत्रापैकीं धनाजीसंबंधींचा अभिप्राय यांत स्वीकारला आहे. ]**

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३८ खर संवत्सरे अधिक बहुल सप्तमी भृगुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री शिवछत्रपति याणी समस्त सेनाधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री जयसिंग जाधवराव सेनापति जप्तन्मुलुख यास आज्ञा केली ऐसीजे—

* * * *

जाधवराव कैलासवासी स्वामीचे संपूर्ण कृपेस पात्र झाले ते आपल्या कर्तृत्वावरी व हुकुमबारदारी एकनिष्ठेवरी झाले राज्याभिवृद्धीविषयी त्याही काही सामान्य कसाला श्रमसाहस केला नाही जीविताची तमा न करिता स्वामिकार्यीच तत्पर राहून, कैलासवासी स्वामीनी जे समयी हुकुम केला ते समयीं कर्नाटकात फौजानी धावून जाऊन प्राप्त झाली संकटे निरसन करून, स्वामिगौरवाचे सुख त्याहीच अनुभविले, व सेवाधर्में करून त्याहीच कैलासवासी स्वामीस संतुष्टविलें तेव्हा स्वामीस मशारनिल्हेविना दुसरे प्रिय की प्राण ( कोणी ) होते असें नाही. सर्व प्रकारें कार्यास येतील हा भरवंसा दृढ मनी मानिला होता. तदनुरूपच राव मशारनिल्हेनी स्वामीचे चरणी चित्तालय करून औरंगजेबासारखा मोठा शत्रु राज्यात पसरला असता, शूरत्वाच्या व कर्तेपणाच्या योगे, शत्रूचा हिसाब न धरता, राज्याचे संरक्षणार्थ असाधारण कसाला केला ! स्वामीच्या तपोबल-प्रभावें करून शत्रु पराभव पाविल्याचें यश मशारनिल्हेस प्राप्त झालें

---

## १७

**पे. द. भा. १३ ले. १५]** [९ डिसे. १७२८

# गिरिधर बहाद्दर बुडविला

**[आमझेराच्या लढाईंत चिमाजी आपानें बादशाही सुभेदार राजा गिरिधर बहाद्दर यास ठार मारिलें त्याचें वर्तमान या पत्रांत आहे.]**

पो छ २१ जमादिलोवल मुा उजनी
दोनप्रहर दिवस

श्री

श्रियासह चिरंजीव राजश्री चिमाजी यासी बाजीराऊ बलाल आसीर्वाद उपरी येथील कुशल मार्गसीर्ष वद्य चतुर्थी इंदुवार मुकाम मौजे बोधेगाऊ टाकली पाा सेवगाऊ जाणून तुम्ही आपणाकडील कुशल वृत्त लिहीत जाणे. यानंतर तुम्ही गेल्यादारभ्य काही कागद पत्र येऊन वर्तमान कळत नाही. तरी साद्यंत वर्तमान लिहून पाठविणे यानंतर साप्रत आजीच वर्तमान आले की तुमचे व गिरधर बाहादर याचे युध्य जाहाले. गिरधर बाहादर याजकडील कित्येक सरदार व लोक मारून गिरधर बाहादर बुडविला. लस्कर लुटून खासा दस्त जाहाला म्हणून वर्तमान आले आहे. यैसियासी ये गोष्टीचे तत्वता वर्तमान काय, आहे तें सविस्तर लिहून पाठविणे लोभ असों दीजे हे आशीर्वाद

---

## १८

**पे. द. भा. १३ ले. १७]** [२४ डिसें १७२८

# "पृथ्वी स्वामीस वश आहे"

श्री

**[बाजीराव व चिमाजी आप्पा यांचा सगळ्या उत्तर हिंदुस्थानावर दहशत बसविणारा पहिला मोठा पराक्रम खालील पत्रांत वर्णिलेला आहे. ते दोघे एकदम पुण्याहून निघाले, चिमाजीआप्पा पश्चिमेच्या बाजूनें खानदेशांतून व बाजीराव पूर्वेच्या बाजूनें वऱ्हाडांतून. माळव्यांत आमझेरा येथें गिरिधर बहाद्दर व**

**दया बहादर हे दोन नामांकित मोगल अंमलदार फौज घेऊन सज्ज असतां त्यांजवर चिमाजी आप्पानें नर्मदा उतरून ता. २८ नोव्हेंबर १७२८ रोजीं पाठीमागून हल्ला करून मोगलांचा फन्ना उडविला. दोघेही सरदार निधन पावले. तें वर्तमान या पत्रांत आहे. ]**

श्रीमंत राजश्री चिमणाजी–
पंत आपा स्वामीचे सेवेसी,

सेवक कृष्णराव महादेव कृतानेक साष्टाग नमस्कार विज्ञापना येथील कुशल ताा पौष शुद्ध पचमी मुा कल्याण स्वामीचे कृपेकरून आमचे व या प्रातीचे वर्तमान यथास्थित असे यानंतर स्वामीनी संतोषाची आज्ञापत्रे पाठविलीं ती प्रविष्ट जाली तेथे लिहिले की दयाबाहादुर याणे चालोन येऊन बारी धरिली. मग आपण सख्ती करून युधप्रसग बरा दाट जाला दयाबहादुर व त्याचे सरदार ठार जाले. लुटून फना केला म्हणून लिहिले, त्यावरून बहुत संतोश जाला स्वामी पुन्यपुरुष, येशस्वी, श्रीची दया व वडिलाचे पुन्य समर्थ, यामुलेच यैसी येशे स्वामीचे पदरी पडतात दयाबहादुर त्या प्राते मोहोरा सामान्य नव्हता त्यासच मोडिला याउपरी पृथ्वी स्वामीस वस्य आहे. याउपरी श्री कधीही न्यून पडो देणार नाही टक्या पैकियासही काये उणे! याउपरी वरचेवर आपणाकडील संतोशवृत्त लेहून समाधान पावीत गेले पाहिजे हे विनंती

---

## १९

**पे. द भा. ४३ ले. १००]** [स. १७३० ?

## " हटनिग्रह कार्यास येत नाहीं "

श्री

**[ देवार्चन अनुष्ठानें इत्यादिकांनीं देवतांची कृपा संपादण्याची बाजीरावासारख्या शूर पुरुषाची भावना पुढील पत्रांत चांगली व्यक्त होते. ]**

**श्रीमदतुलधिषणवैभवोपार्जित
साम्राज्यलक्षण लक्ष्मीरक्षण दंडि-
तोदंडदोर्दंड गोब्राह्मणप्रतिपालक**

श्री बाजीराव बल्लाळ प्रधान पंत याप्रति आश्रित मुकुंदभट्ट तथा ज्योतीभट्ट माहवलीकर याचे अनेक त्रिकाल वेदोक्त आशीर्वाद उपरी. तुमचा निरोप आला होता की श्रीहनुमंतास अक्षा उपोषणा करा. यास नव उपोषणे झाली. यास देवापाशी प्रार्थना करून प्रसाद मागितला. त्यास कार्यसिद्धि करितो म्हणून उत्तम मस्तकीचा प्रसाद दिल्हा. या देवाजवळ अति हटनिग्रह कार्यास येत नाहीं नाना प्रकारीचे भय दाखवितो आहे. यास दाहा ब्राह्मण मिळोन प्रार्थना केली त्यास दृष्टात जाहला कीं उपोशण करून सेवा करूं नका. आपली मनकामना जे असेल ती पूर्ण करितो. अशास तुमची आज्ञा ज्या प्रमाणें होईल त्या प्रमाणे वर्तणूक करूं. त्यास दाहा दाहा प्रकारीचा गोष्टी सागतील ते आपण चितावर न घेणें. या देवाजवळ आपला भावार्थ असो देणे कार्यसिद्धी जाहाली असाच निश्चय असो देणे. देवाची पूजासामग्री पाठऊन देणें केशर, कस्तुरी, मोगरेल, अतार, बुका, कापूर, उदकाड्या इतकी सामग्री पाठऊन देणे. यास बापोजी मोरा खासबारदार, सागता कळो येईल. या पत्राचे प्रतिउत्तर सत्वर पाठवणे. सुज्ञाप्रति बहुत काय लिहिणे हे आशीर्वाद.

— —

## २०

**ब्रह्मेंद्रस्वामी च. ले. २६ ]** [ २ एप्रिल १७३१

# " स्वामींच्या आशीर्वादें फत्ते "

**[ सेनापति खंडेराव दाभाडे निजामास सामील झाला म्हणून बाजीरावानें त्याजवर गुजरातेंत स्वारी केली. ता. १ एप्रिल १७३१ रोजीं डभोई येथें लढाई होऊन त्रिंबकराव मारला गेला. त्याचें वर्तमान पुढील पत्रांत आहे. ]**

श्री

महाराज परमहंस श्री. स्वामींचे सेवेसी :—

चरणरज बाजीराव बल्लाळ प्रधान कृतानेक विज्ञापना. येथील क्षेम ता. छ. ५ सवाल नजीक डभोई यथास्थित असे. येथील वर्तमान तरी त्रिंबकराव दाभाडे व उदाजी व आनंदराव पवार व कंठाजी रघुजी कदम व पिलाजी गायकवाड

व चिमणाजीपंत दादा असे तीस पस्तीस हजार फौजेनिशीं आम्हासीं युद्धास आले. छ ४ सवालीं युद्ध जाहले त्रिंबकराव दाभाडे व जावजी दाभाडे व मलोजी पवार व पिलाजी गायकवाडाचा पुत्र ऐसे चौघे ठार जाहले उदाजी पवार व चिमणाजीपंत पाडाव जाहले. आनंदराव व पिलाजी गायकवाड व कुंवरबहादर जखमी होऊन पळून गेले, व बाडे पळाले. फौज लुटली हत्ती पाडाव केले साराश स्वामींचे आशीर्वादे फते जाहली आपणास कळावें यास्तव लिहिलें आहे. निरंतर स्वामीचें चिंतन करीत असो सदैव पत्री परामृष केला पाहिजे. आपणाकडील नारायणजी ढमढेरे ठार पडले व आणखीही कित्येक लोक पडले व जखमी जाहले; परंतु कार्य जाहलें कळलें पाहिजे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

## २१

**वि. ज्ञा. वि. नोव्हेंबर स. १९२१ ]** [ स. १७३१ ?

# " हा अयत्नी मार्ग ऐसाच आहे "

**[ शिवछत्रपतीची सून, संभाजीची राणी, शाहूची मातुःश्री येसूबाई सुमारें तीस वर्षें बादशहाच्या कैदेंत राहिली. नंतर बाळाजी विश्वनाथानें दिल्लीस जाऊन तिला सोडवून दक्षिणेंत आणिले. तिच्या मृत्युसंबंधाचें हें सांत्वनपत्र पुतण्या कोल्हापुरकर संभाजीनें शाहूस लिहिलें आहे. हिचें लग्न स. १६६९ त झालें. या बाईची मान्यता दक्षिणेंत फार मोठी होती. ]**

श्रीमत् सकलतीर्थस्वरूप राजश्रिया विराजमान राजश्री शाहूराजे दाजी वडिलाचे सेवेसी,

अपत्य संभाजीराजे दंडवत विनंति उपरी वडिली आशीर्वाद-पत्र पाठविलें ते प्रविष्ट जालें मातु श्री येसूबाई साहेब यासी वेथा होऊन कैलासवास जाला म्हणोन लिहिले, त्यावरून ममताविषयें चित्तास परम खेद प्राप्त जाला. हा अयत्नी मार्ग ऐसाच आहे वडील सर्वज्ञ आहेत. विवेकेंकरून चित्ताचें सातवन होय तें केलें पाहिजे विशेष लिहावें तरी वडिल सुज्ञ आहेत.

---

२२

पे. द. भा. ९ ले. ११ ] [ १४ फेब्रु. १७३५

# तुमच्या आसीर्वादें आम्हास काय न्यून ?

**[ बाळाजी विश्वनाथाची पत्नी व बाजीरावाची माता राधाबाई हिची मान्यता पेशवाईच्या अमदानींत फार मोठी होती. ती काशीयात्रेस निघाली तेव्हां चिमाजी आप्पानें तिला लिहिलेलें पुढील पत्र पुत्रभावनेचें निदर्शक आहे. ]**

श्री

मातुश्री बाई यासी,—

अपत्ये चिमाजीने कृतानेक साष्टाग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागायत फाल्गुन सुध त्रितीया भृगुवार संध्याकाळ तुमच्या आसीर्वादे करून सुखरूप असो विशेष चिरंजीव सदाशिवास पाठवावयाचा विचार आपल्यासी बोलून आलो होतो त्यास विचार पाहाता चिरंजीवास सवाई जेयसिगाचे घरी बहुमान होईल हा येक अर्थ; वरकड चिरजीवाचे यात्रेचे हे दिवस आहेत यैसे नाही बहुमानाची गोष्ट म्हणावी तर तुमच्या आसीर्वादे आम्हास काये न्यून केले आहे ? दोन पर्याय तो या प्रकारचे आहेत परंतु तिसरा पर्याय तुमची आज्ञा क्षेपनिक्षेप पाठवावे यैसीच असली तर लक्ष प्रकारे पाठऊन देऊं. तुमच्या समाधानापेक्षा आम्हास दैवत दुसरे नाही तुम्ही यात्रा करावयास जाता. देवधर्म तीर्थ करावयास चिरंजीवाचा पायगोवा होईल यैसे आहे. आपण तुमचा निरोप घेतला ते समई आपण पाय उतारा तुमचे पालखीसमागमे घटकाभर येऊन मग निरोप घेऊन यावे यैसे होते, परंतु ते समई चित्तात आले नाही, यामुळे चित्तात आलीकडे आलीयावर हळहळ वाटली. आपले समाधान पूर्वक आसीर्वाद पत्र आले म्हणजे चित्तातील हळहळ दूर होईल. हे विनंती. छ २ सवाल दुपाहार

## २३

**राज. खं. ३ ले. १६७]** [११ जाने १७३९

# " मीच तुमचा बाजीराव "

**[ भीवराव रेठरेकर या नांवाचा एक गृहस्थ बाळाजी विश्वनाथाचा ऋणानुबंधी व साह्यकर्ता असून, त्याला दोन मुलगे झाले, त्यांचीं नांवे बाजीराव व चिमणाजी अशींच ठेवण्यांत आलीं. बाजी भीवराव रेठरेकर बाजीराव पेशव्याचा भरंवशाचा सरदार होता. तारापुरच्या हल्लयांत तो मारला गेला, तेव्हां त्याच्या मातुःश्रीस पेशव्यानें पाठविलेलें पुढील सांत्वनपत्र मासलेवाईक आहे. ]**

गंगाजान्हवी समान मातुश्री वेणूबाई काकी वडिलाचे सेवेसी,—अपत्ये बाजीराव बल्लाळ साष्टाग नमस्कार वि।। येथील ता। पौष वद्य १३ पावेतो स्वकीय लिहीत जाणे विशेष

पौष शु। ११ स तारापुरावर हल्ला केला ते समयी बाजी भीवराव तोडात गोळी लागून कैलासवासी जाहाले ईश्वरे मोठें अनुचित केले तुम्हास मोठा शोक प्राप्त जाला आमचा तर भाऊ गेला. त्यास, तुम्ही वडील दुःखाचे परिमार्जन करून विवेक करावा. त्याची मुले व चिमणाजी अप्पा आहेत, त्याचेहि त्याजपेक्षा अधिक चालेल परंतु आमचा भाऊ गेला बाजू गेली उपाय नाही त्यास, चिमणाजी भीवराव हे पाठविले आहेत, हे सागतील ते ऐकावे. साराश, मीच तुमचा बाजीराव असा विवेक करून धीर धरावा मजवर दृष्टि द्यावी. बहुत काय लिहिणे, लोभ कीजे हे विनंति

---

## २४

**राज. खं. ३ ले. २७]** [१३ मे १७३९

# " टोपीकर म्लानत्व पावले "

**[ चिमणाजी आपानें ब्रह्मेन्द्रस्वामींस लिहिलेलें वसईच्या युद्धाचें खालील वर्णन भाषेच्या व भावनेच्या दृष्टीनें उद्‌बोधक आहे. ]**

श्री.

श्रीमंत महाराज श्रीपरमहंस बावा स्वामीचे सेवेशीं,—

अपत्यें चिमाजीनें कृतानेक सा।। नमस्कार. विज्ञापना. येथील कुशल ता।। वैशाख बहुल प्रतिपदा पर्यंत मुक्काम वसई स्वामीचे आशीर्वादेकरून सुखरूप असो. विशेष.

स्वामीचे अभयावरून वसईस मोर्चे माघ शु।। दशमीस लाविले. त्यादारभ्य मोर्चे चालविले व धमधमे चारपाच बांधले. सुरंग चालविले जे जे उपाय स्थळ हस्तगत करावयाचे ते केले. फिरंगी यानीं निराकरणाचा मंत्र पूर्वी युद्धप्रसंगीं मोठ्यामोठ्या सुरांनीं केले. तदन्वयें फिरंगियांनीं सुरंगावर व धमधमेयावर गरनाळा टाकिल्या सुरुंग विच्छिन्न केले. पनळ लावून पाणी सोडिलें. आगीचे ओडे जळके टाकून त्यावर तेल, दारू, राळ टाकून चार चार रोज डोंबाराही* सारखा करी. बरकंदाजी व तोफाजी फिरंगियाची निस्सीम म्हणावी तैशी. तथापि स्वामीचा आशीर्वाद व दंड हे सबळ शस्त्र आम्हाजवळ त्याचे प्रतापे इकडून तोफा लागून फिरंगियाच्या तोफा मना केल्या. सफेल § पाडून लेश केली वसई जागा बाका बुलंद. सुरुंगाचा उपाय नाही. परंतु स्वामीचे कृपाकटाक्षें सुरुंग चालवून दोही बाजूंनीं खाब, वरती तक्तपोशी, त्यावर दोन अडीच हात रेती टाकून सुरुंग नेऊन पोहोचवून, दोनशें पाथरवट लावून मोठे मोठे चिरे फोडून सुरुंगाचे बुधलियास जागा करून, वैशाख शु ।। पंचमीस सकल सिद्धता करून, सुरुंग लोकास बाजू वाटून देऊन नगारेयाची इशारत करून, सुरुंग उडताच सर्वांनी येलगारास † उठावे, बुरजावर चढावें, शिड्या टेकून चढावें, ऐसा करार करून वैशाख शु ।। ६ बुधवारी दोन घटका दिवस प्रातःकाळचा येताच सुरुंगास बत्त्या दिल्या डाव्या बाजूचे सुरुंग काही उडाले, काही उडणे होते, तोच लोकानी उतावळी करून कोटावर चालून घेतले; तो दुसरे सुरुंग तेच बाजूचे उडाले, त्याणी लोक दडपले व जाया व ठार झाले तसेच उजवे बाजूचे सुरुंग उडाले. एक दोन उडतांच बुरजास वाट जाहलीशी देखून लोक वरते चढले, तों दुसरे सुरुंग उडाले, त्यांणी वरते लोक चढले होते ते उडोन गेले लोक कचकरले. हिरमोड होऊन काम बंद पडिले.

---

* डोंबारा=आगीचा लोळ. § तटबंदीच्या मागील बाजूचा धक्का. † हल्ला करण्यास

फिरंगीयानी संभाळून हुके व गरनाळा व रेजगरीचा मार न भूतो न भविष्यति केला त्याणे लष्करचे लोकास व हशमास अवसान राहिले नव्हते

उजवे बाजूचा मातबर सुरुग राजश्री मल्हारजी होळकर याजकडील उडणें होता, त्याचा शोध करून, पुन्हा त्यात बुधले घालून रजक ‡ दुरुस्त करून लोकाची निवड केली, आणि सुरुंग उडताच खामखा निशाणे चढवावीसा करार करून वैशाख शु॥ ७ गुरुवारी उजवे बाजूचा सुरुग उडविला. तेच समयी लोक जाऊन बुरूज अर्धा उडाला त्यावजर चढले फिरंगीयानी सफेलीच्या आतून मेढा ₰ घालून पेटी भरून तोफा जाऊन तयार होताच तेथे फिरंगी बळाऊन होके गग्नाळाचा दारूच्या पोत्यास आग लावून मार केला व रेजगिरीचा मार सीमेपरता केला लोकावरी अग्नीचा पर्जन्य करून भाजून काढिले तथापि स्वामीचे अभय आशीर्वादाचें वज्रकवच लोकाचे आगी होते तेणेकरून आगीची तमा न धरिता लोकानी हत्यार वरेबजेने केले फिरगीयानी मरदुमी शिपाईगिरी करावी तैशी केली त्याप्रमाणे इकडील लोकानी भारती युद्धाप्रमाणे युद्ध केले.

या मागे युद्धे बहुत झाली परतु या लढाईस जोडाच नाही सर्व स्वामीचा आशीर्वाद लोक बुरूज सोडीनातसे जाहले, तेव्हा स्वामीच्या दंडकप्रहारे करून फिरंगी धर्मद्वेष्टे बेहिमत होऊन अष्टमीस प्रहरा दिवसास कौलास आले कौल घेतला आठ दिवसात कबिलासुद्धा झाडून जातोसे करार केले याजवरून मार तहकूफ केला फिरगी याणी कबिले वस्तभाव गलबतात भरिली काल वै॥ पौर्णिमेस फिरंगी झाडून गेला स्वामीच्या पुण्येकरून जागा फते झाली.

लष्करचे व हपमाचे लोक सुरगाने उडाले व जाया ठार अदमासे पाच हजार किंबहुना विशेष होतील तैसेच फिरंगीयाचे सातआठशे माणूस ठार व या निराळे जखमी झाले भारती युद्धाप्रमाणे युद्ध झाले वसई बाकी जागा, पश्चिमेकडून समुद्र, दक्षिणेस खाडी, पूर्वकडे खाजणचिखल, तिहीकडून किमपि इलाज नाही एक उत्तरेकडून उपाय तिकडेही रेती, धर नाही स्वामी साक्षात्कार ईश्वराचा अंश स्वामीनी वसई दिली त्रिवार लिहिले ते शब्द अन्यथा कसे होतील ?

‡ दारू पेटविण्याचें छिद्र ₰ दुबेळका खाब.

वरकड वसईची गोष्ट मानवी लोकानी म्हणावी असे नाही वसई स्वामीचे आशीर्वादे फते झाली. श्रीचे सुदर्शन धर्मद्वेष्ट्याचे मस्तकी वज्रप्रहार होऊन टोपीकर म्लानत्व पावले. अन्यथा वसई वसई होती व फिरंगी आगीचा पुला[१] होता. स्वामीचे कर्तृत्वास पार नाही स्वामीचा महिमा स्वामी जाणत आम्हा मानवी लोकास काय कळे ?

वसई फते होताच सव्वाशे पुतळी पाठवून देणे व श्रीमुलेश्वरास सव्वाशें रुपयाचा मुगुट घातला म्हणोन आज्ञा केली. याजवरून स्वामीचे आज्ञेप्रमाणे वसई फते होताच श्रीनिवास केदार याजबरोबर पुतळ्या सव्वाशे व श्रीमुलेश्वास मुगुट सव्वाशे रुपयाचा घातला, ते रुपये १२५ सव्वाशे स्वामीचे सेवेशी पाठविले आहेत प्रविष्ट होतील आम्ही लेकरे स्वामीची असो सर्व प्रकारे कृपा करणार स्वामी समर्थ आहेत स्वामीचे वितरिक्त दुसरे दैवत आम्हा काय आहे ? साराश स्वामीच्या आशीर्वादे व दंडाच्या प्रतापे कार्यसिद्धीते पावले असे स्वामीचा महिमा आम्ही वर्णावयास सामर्थ्य धरीत नाही श्रीनिवास केदार पुतळ्या व रुपये देऊन रवाना केले आहे ते लवकरच पावतील वर्तमान त्वरेने विदित व्हावे यास्तव हे पत्र पुढे रवाना केले असे सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना

## २५

**पोर्तुगीझ व मराठे भाग ४ ]** [ १२ मे १७३९

# पराक्रमाची सीमा,....वसई काबीज

**[ वसईच्या युद्धाचें दुसरें पत्र चिमाजी अप्पानें शाहू छत्रपतीस लिहिलेले गोव्याचे सुप्रसिद्ध संशोधक प्रो. पिसुर्लेकर यांनीं "पोर्तुगीज व मराठे" या मालेच्या चौथ्या भागांत ते छापलें असून तें त्यांस गोव्याच्या दप्तरांत आढळले. मुळांत भाषेच्या चुका दिसतात. ]**

[१] गठ्ठा, भारा.

श्री

श्रीमत् क्षत्रियकुलावतंस महाराज राजश्री छत्रपती स्वामीचे शेवेस —

विनंति शेवक चिमणाजी बल्लाळ कृतानेक विज्ञापन्हा शेवकाचे वर्तमान तागायत छ १४ सफर मोकाम वसई महाराजाचे येथास्तीत असे विनति वसईस मोर्चे छ ८ जिलकादी † लाविले वसईचा बिलद उंच वीस बावीस हात रुंधी इमारत बारा हात पकी गजी तोफा थोर व दारुगोळा व हुके गरनाळास न्यून नाही वसईच्या कोटास पश्चिमेकडेस समुद्र, दक्षिणेकडे मातबर खाडी, पूर्वेकडे खाजण चिखल, तीन अगास उपाय नाही, उत्तरेकडेस खुसगी तिकडे वाळूची जमीन दोन हात खंटल्याने पाणी लागते जागा पका फिरंगीयाच्या कोटात चार हजार माणूस त्यामध्ये एक हजार ढोणे फिरंगी पुर्तुकाली बाकी तीन हजार किरस्ताव वगैरे एक हजार जुजते माणूस खबरदार होते आरमार सामान वसईच्या बंदरात तयार मोर्चेवर मार कोटाचा व आरमाराचा होत होता तेव्हा शेवकानी तीनसे तोफा व दोनसे फटगड्या लाग करून रात्रदिवस मार देऊं लागलो पाचसातशे गोळा नित्य कोटास गेला या निराळे धवधंबे पाच एक दोनसे हातावर दुसरा शभर हातावर तिसरा साठी हातावर चवथा तीसा हातावर. पाचवा कोटाजवळ याप्रमाणे कोटापासोन तफावतीने बाधोन, करोल व बरखंदाज व जताल बालदार बरते बसऊन, मार राखोन फिरगीयासी सफेलीवर मार करू लागलो फिरंगी यानी धंवधंबेवर व मोर्चवर गरनालाचा मार नित्य सीमेपरता केला. त्यानी मोर्चेतील व धवधंबेतील माणमे जखमी व ठार होत. तथापि महाराजाचे प्रतापे, लोकानी हिमत न सोडिता जीवित्व त्रुणप्राय साहास करूं लागले. सुरुगाच्या उपाय केला. त्यास जमीन रेतीची धर नाहीं याजकरिता सुरुंग खडोन दोन बाजूनी खाबावर तख्तपोसी, त्याजवर दोनअडीच हात रेती, गरनाळेस फुटेना असे करून सुरुंग बारा चवदा चालविता, हे बातमी फिरगीयास कळलियावर, सुरुंगावर मोठमोठीया गरनाळा टाकून, सुरुंग मोडून टाकिले. दाहा पाच सुरुंग याच रीतीने विछिन्न केले तदोपर चोरीनें दाहा सुरुंग कोटास न्हेऊन, लाग करून, टार्की बाजता, फिरगीयानी आईकून पनाळानी पाणी सोडिलें पाण्याचा उपाय न चालेसा जाहाला तेव्हा आगीचा मार करून, मोटे मोटे

---

† ता. ७ फेब्रुवारी १७३९ * अगडबब, अवजड.

ओंडे पेटवून खाली टाकून, त्यावर राळ व तेल टाकून, च्यार पाच रोज डोंब केला. तरी उपाय न चालेसा जाहला, तेव्हा कुसीचे बाजूने नारळीचा मेढा घालून, पेटी भरून, तोफा लागू करून, तोही तयार जाहाला. शेवकाकडून सुरुंगाची तयारी छ ३ सफरी जाहाली लष्करच्या लोकास व हशमास बाजू वाटून देऊन, सुरुगास नगारेची इशारत करून सुरुंग उडताच सर्वांनी एलगार करून जागा फते करावा, ऐसा सिद्धांत करून सुरुंग भरोन लिपोन घेऊन बत्या भरून आणून छ ४ सफरी बुधवारी * प्रातःकाळी दोन घटिका दिवस येता सुरुंगास बत्त्या दिल्ह्या

जेथे बत्तीस सरदही पोहचली नाही तो अगोदर उडाला काही सारदी पोहंचली त्यास जरा विलंब लागला दोन सुरुग उडालेच नाहीत त्यास प्रथम सुरग उडताच लोकानी उताविळी करून हल्ल्यास उठले काही कोटाखाली गेले काही थोडेथोडे कोटाचे बुरूज उडाले त्याजवर लोक चढले तो मागून दुसरे सुरुंग उडाले त्याणे लष्करचे व हशमाचे लोक दडपले कित्येक दगडानी जखमी जाहाले काही लोक बुरुजावर चढले होते, ते सुरुगाने उडोन गेले तेच फिरंगीयानी साभाळून हुके व गरनाळे व दारूची मडकी व तोफाचे रेजगरीचे मार सीमेपरता केला माणूस जाया व टार बहुत जाहाले दोनही बाजूंनी लोक थडकून कसरले काम सुत्धारले लोक धीरमोड जाहाले ते दिवशी काम काही जाहाले नाही उजवे बाजूचा सुरंग मातबर बाधला होता, त्याचा शोध करून पुन्हा सुरुंगात आणखी दारूचे बुधले घालून, बत्ती दुरुस्त करून, लिपोन घेऊन छ ५ सफरी महाराजाचे नामस्मरण करून, लोकाची निवड केली होती, त्यास जोरावार ताकीद केली की, पडेल तो पडेल, राहिल त्याणे खामखा महाराजाचें निशाण कोटावर चढवावे असे करून बत्ती दिल्ही सुरुंग उत्तम प्रकारे उडाला. तेच लोकानी चालोन घेऊन सिमा बुरूज उडाला त्याजवर निशाणे चढविली. तो फिरंगीयानी भेढेयातून साभाळून हुके व गरनाळा व दारूचीं मडकी व दारूचा जोत्या व तोफाचा रेजगार ऐसा मार कुबल केला, तेव्हा लोक भाजून कोंडिले फिरंगीयाजवळ आगीचे बल भारी तरी लोकानी डोया देऊन बुरुजाच्या कराडीयास † दम धरून राहिले फिरगी यानी तीन वेळा आम्हाकडील लोकावर लगट करून, उधलोन दिल्हे

---

* २ मे १७३९. † लाकडाचे ओंडे.

तरी लष्करच्या व हशमाच्या लोकानी छातीचा कोट करून पुनः परडियासि व बुरुजाच्या बघलीस बसोन काईम जाहाले तसेच बुरुजाचे तळवटीस तहके खाणोन आश्रा केला दोन रोज येलगार केला त्यास सुरुग उडाले त्याखाली लोक दडपले व जखमी ठार अजमास चार पाच हजार होतील तैसेच फिरंगीयाचे दोनही येलगारा अगोदर दोनसे असे सातसे ठार जाहाले या निराळे जखमी जाहाले मेढी मारुन फिरंगी बोलावला होता. मेढा जालावयाचा विचार केला होता परंतु ते रात्रीस लाग चालिला नाहीं फिरंगी यानी हिमत धरून सिपाईगिरी म्हणावी तैसी केली ज्याचे नाम सिपाईगिरी सुरुंग उडाले बाहेरील लोक निमी बुर्जास जाऊन पोहचले असता अन्यात्रानी दम धरावा तेणें प्राप्त कार्ये आहे तेच फिरगीच की इतुकी मर्दुमी करुन, मेढा नूतन व बाहेरून आम्हाकडील लोक जुजले त्याणीही मर्दुमी सीमेपरती केली. पूर्वी भारती युद्धात अतिरथी महारथी झुंझले त्याच न्याये प्रस्तुत काळी महाराजाचे येकनिष्ट शेवकलोकीं विरथीपण जुझले दीड प्रहर परियेत आगीचा मार प्रजन्य फिरंगी यानी केला तितका सोसून राहिले इतुकी आग पिऊन मराठे फौजेने दम धरिला असे जाहाले नाही सीमा केली जागा काईम राखिला कोट घेतले खेरीज उठत नाही, असे पुर्ते कळले तेव्हा फिरंगी बेहिमत होऊन कौलाची बोली लागली § मातबर फिरगी बाहीर येऊन शेवकास भेटले आठ रोजाची मुदत द्यावी, शंभर गलबते द्यावीं म्हणजे झाडून मुंबैस जातो. असा करार करून गेला आम्ही जेथिले तेथे मोर्चे काईम राखोन फिरगी यासी कौल दिल्हा फिरगी यानी मुंबैहून शेदीडसे गलबते भाडेने आणिली व शेवकानी शंभर गलबते दिल्ही. त्यावर कुल कबिले वस्तभाव चढवून छ १३ सफरी * फिरंगी गेला

जागा महाराजाचे पुण्यप्रतापे फते जाहाला. वसईसारिखा जागा बाका बिलंद कोणी गोष्टीचा अपाय नाही. याहीमध्ये फिरंगी याचा जागा सर्व गोष्टीने सजुती सामानपुर. लढाईला हे जागा येणे दुरोबस्त ( दुरापास्त ) होती परतु महाराज पुण्यप्रतापी महाराजाचे पुण्यप्रभावास जोड नाही. तत्प्रभावेंकरून फिरंगी आयास येऊन जागा हस्तगत जाहला अन्यश्रया जाग्यास उपाय आहे असे नाही महाराजाचे प्रतापतेजोद्भवे सार्वभौमादिक म्लान होऊन महाराजाची कीर्ति समुद्रवलयाकित पृथ्वीत प्रफुल्लित जाहाली आहे फिरंगी याचा जागा वसई

§ ४ मे, १७३९, * ११ मे, १७३९,

हस्तगत जाहालियामुळे, समुद्रात सर्वास दहशत प्राप्त होऊन चौऱ्याशी बंदरातरी महाराजाची सलाबत गालीब* जाहली महाराज ईश्वरी अश जे गोष्टी यामागे कर्णद्वारा श्रवण जाहाली, ते या कलयुगी महाराजाचे पुण्यप्रभावे दृष्टीगोचर होते. अघटित गोष्ट घडोन येते. पूर्वी दाशरथी व श्रीकृष्ण व पाडवादिक अवतारी याणी दैत्यादि दमन करून, देव ब्राह्मणाचा आशीर्वाद घेतला त्याच न्याये महाराजानी या युगी अवतार धरून धर्मद्वेष्टे दैत्याचा निःपात केला महाराजाचा स्तुतिस्तव मानवी लोकानी करावा असे सामर्थ्य काय आहे ? मुख्य गोष्ट महाराजाचे पुण्ये वसई फते जाहाली अन्यत्राम शेवक लोकाचा उपाय होता असा अर्थ नाही विस्तारे वृत्त महाराजाचे शेवेसी विदित व्हावयास्तव विनतिपत्र लिहिले आहे शेवेसी श्रुत होय, हे विज्ञापन्हा

---

## २६

राज. खं. १ पृ .९६ ] [ मे १७४८

# पेशवेकालीन शिक्षण व शिस्त

**[ ऐन उमेदीच्या काळांत पेशव्यांचे गृहशिक्षण व कुटुंबांतील शिस्त कशा प्रकारची होती आणि छत्रपतींशीं त्यांचा घरोबा कसा चालू होता याचें गमक पुढील पत्रांत मिळतें. ]**

" चिरंजीव राजश्री रघुनाथ यासी प्रति बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद, उपरी विशेष. येथून जाते समयी जे सुचले ते तुम्हास सागितले आहे त्याचे स्मरण निरतर मनात असू देत जाणे. रघुवंश विदुरनीति, चाणक्य व जे तुम्हास येत असेल, त्याची नेमपूर्वक चितनिका करून, थोडेबहुत शास्त्री याजवळ नित्य म्हणत जाणे विराटपर्वापासून पुढे भारत रिकामपणी वाचीत जाणे. केवळ घोडी फेरावयाचे छंदास न लागणे वजनी, कैली, बेरीज बराबर करावयाचा सराव बहुत करणे चिरंजीव भाऊची मर्जी बहुत प्रकारे रक्षण करीत जाणे जे आज्ञा करतील तेच काम करावे बहुत करून भाऊ बरोबरच जेवीत जाणे घोडी वेगळी बाधीत न जाणे, क्षुद्र मनुष्याशी सहवास कोणे प्रकारेही न करणे.

---

[1] जोरदार.

मातुश्रीबाई ( = राधाबाई ), ताई ( = काशीबाई ), अनुबाई यासी एक दो दिवशी अर्ध घटकाभर जाऊन बसत जाणे शरीरप्रकृत नीट नाही यास्तव औषध काही नेमेकरून घेत जाणे भाऊसमागमे घोडी फेरावयास जात जाणे सातारियास जर जावयाची आज्ञा केली तर त्रिमणगिरि गंगाधर भटास, भाऊजवळ विनंति करून, बरोबर दिल्हे तर घेऊन जाणें सातारियास गेलियावर दोही बाईकडे विना बोलविल्यावाचून, अथवा गोविंदराव यानी आपणहून सागिल्यावाचून, न जाणे कालानुरूप, वयास उचित योग्य वेष करीत असावे. देवपूजा थोडी परंतु एकाती, न बोलता करीत जाणे इतकेही नेमेकरून करावें, आणि गर्व न करावा, निरंतर साधन वृत्तीने वडिलाची मर्जी उत्तम असलिया पुसावे. शिष्यधर्मे असलिया फार उपयोग आहे चिरंजीव जनार्दन बहुत कामही करून पढतात. ते हर एक गोष्टीत अधिक जाहल्यास तुम्ही त्यास मान्य पुरुष कसे व्हाल ? विशेष काय लिहिणे ? येथील वर्तमान तर उदेपुराजवळ पचविसा दिवसात पावलो श्रीकृपेने मेहेनत करून दिल्लीचे सुमारे जात आहो जसे पुढील वर्तमान होत जाईल, तैसी योजना होईल हे आशीर्वाद

## २७

**पुरं. द. भा. १ ले. १५४ ]** [ २९ फेब्रु० १७४४

# महादेव भट हिंगण्याचा मृत्यु

**[ हिंगणे हे पेशव्यांचे नाशिक येथील क्षेत्रोपाध्ये. बाळाजी विश्वनाथ स. १७१८ त दिल्लीस गेला तेव्हां त्याने आपल्याबरोबर महादेव भटास घेतलें. बाळाजी परत आला तेव्हां दिल्लीच्या वकिलातीवर त्यानें आपल्या भरवशाचा इसम म्हणून महादेव भटाची नेमणूक तेथें केली. तेव्हांपासून हिंगणे राजकारणांत मान्यता पावले. उद्योगास क्षेत्र मिळतांच महाराष्ट्रीय घराणीं कशीं भराभर उदयास आलीं त्याचे हें एक ठळक उदाहरण आहे. दिल्लीच्या वजिरास दक्षिणेंतला भिक्षुक आव्हान देतो हा पत्रांतील प्रकार लक्ष्य आहे. ]**

चिरंजीव राजमान्य राजश्री धोंडोबा यासी, सदाशिव चिमणाजी आसीर्वाद उपरी. येथील कुशल ताा छ २५ मोहरम जाणून स्वकीये कुशल लेखन करीत जाणे विशेष काल दोन प्रहरा दिल्लीहून राजश्रीकडून वकील इछाराम आहे, त्याचे पत्र तेविसावे रोजी येथे आले, त्यात खुलासा हाच, की नादरशहाने रूमच्या बातशाहीवर चढाई केली त्यास नादरशहास मारून काढिले. फिरून नादरशाहा आपली फौजबंदी करीत आहे व तोहमास कुलीखान खंदारच्या मुलकात आहे, त्यासहि नादरशहाचे पत्र आले आहे की येणे व रूमातहि फौजबंदी होत आहे, हे येक वर्तमान लिहिले व दुसरें लिहिले आहे की मनसूर आलीखान व अमीरखानही दिलीस आले त्यास साप्रत माहादे[व] भटानी सवाईजी * मेलियावर त्याची वकिली आपणाकडे करून घेतली आहे पहिला कृपाराम होता त्यास जैसिगनगरात ठेविले माहादेव भट मनसूर आलीखान याच्या दरबारी गेले, त्यास बरावर सवाईकडील जमातदार व प्यादे होते. त्यास त्याची याची हकाविसी बोली जाहाली. त्यास महादेव भटानी सिवी दिल्ही आणि आपले लोकास बोलले की धरा. त्यावरून त्याची याची लटापटी जाहाली माहादे[व] भटास जखमा लागल्या. त्याच्या पुत्रासही जखम लागली. संध्याकाली घरास गेले. मध्यरात्री मृत्यु पावले. पुत्र मात्र वाचले मोठी गोष्ट वाईट जाहाली. पत्रें आली ती तीर्थस्वरूपाकडे रवाना केली बहुत काये लिहिणे हे आसीर्वाद

## २८

पुरं. द. भा० १ ले. १७६ ] [ जून १७४८

# घरगुती अडचणी

**[ सदाशिवराव भाऊने हें पत्र धोंडो आपा पुरदरे यास लिहिले आहे. त्यांत घरगुती अडचणीचें प्रतिबिंब दिसतें तें सामाजिक दृष्ट्या विचारणीय आहे. ]**

श्री

आसीर्वाद उपरी. गोपिकाबाई परवा येणार त्यास, येक बाईको घरीं गरवार असता बाहेरून दुसरी आली तरी जोपर्यंत प्रसूत होये तोपर्यंत भेटी परस्परे

* सवाई जयसिग, २३ सेप्टेंबर, १७४३ रोजीं मरण पावला.

बाइकाची न व्हावी आसे आहे त्यास प्रस्तुत बाई § येथे नाहीं, ताई ‡ आहेत त्याकडून चौघास पुसून ज्याप्रो आसेल त्याप्रो करून रहावेसे जाले तरी बरेच जाले, जावेसे जाले तरी तूर्त तात्याचे येथे पाठऊन पुढे वहिनी † आलियावर त्याचे विचार लोहगडास पाठवणे तरी पाठवावे लागेल. त्यास लोहगडची हवा वाईट सासूची मर्जी येक प्रकार, इचे पोरपण दूर नसावे बरे जाणेच तेव्हा तात्याचे येथे ठेवावे किंवा माहरी जावे हे पुर्त रीतभात मनात आणून लिहिणे

ताईजवळ पाचसात बाइकाचा शोध केला त्यास ही रीतच नाही येक दोन दिवस घरचीने बाहेर आसावे, बाहेरची जुनी जालीयावर येके जागा कोनी * देखील निघतात आसे आहे आणखी शोध करितो आसे जाले तरी बरेच जाले तरी त्याचा विचार लिहिणे कोकणस्तात दडक नाही, देसस्थात आहे आसे बोलतात. यातही जसे होईल तसे करून पत्राचे उत्तर पाठवणे सखाराम-पंतासी$ बाबूरायासी// अमा मजकूर बोलत असतो रवाना मंदवार तिसरा प्रहर हे आसीर्वाद उत्तर लौकर पाठवणे आथवा येथले माणूस भागले तरी तेथून पाठऊन देणे हे आसीर्वाद

## २९

**पे. स्फु. ले भाग ४ ले० ५ ]** [ १५ डिसे. १७४९ च्या आधीं.

## " तुमचे मस्तकीं हात "

**[ शाहू महाराजांस पुत्रसंतान नव्हते म्हणून अंतसमयीं त्यांस फार दुःख होऊन पुढे राज्यभार कोण चालविणार याबद्दल चिंता उत्पन्न झाली. पुष्कळ तपास व खल केला. पेशव्यांशिवाय इतरांच्या हातून राज्याचा निभाव लागणार नाहीं अशी खात्री पटून त्यांनीं मरणापूर्वीं दोन लेख स्वहस्तानें लिहून पेशव्यांचे स्वाधीन केले आणि त्यास राज्यभार चालविण्याची आज्ञा केली. याच आधारावर पेशव्यांनीं पुढील उद्योग केला. हे दोन लेख मृत्युपत्रासारखे महत्त्वाचे आहेत. ]**

§ राधाबाई–बाळाजी विश्वनाथाची बायको ‡ काशीबाई–बाजीरावाची बायको. † गोपिकाबाई * कोनी निघणे=बाळंत होणें. $ सखाराम बापू बोकील // बाबूराव पेठे–सदाशिवरावाचा मामा.

**यादी—१**

श्री

राजमान रा बालाजी प्रधान पडित यास आज्ञा—तुम्ही फौज धरने सरवास आज्ञा केली त्याच्या दैव नाही महाराजास दुखने जाले नाही बर होत नाही राजभार चाला पाहिजे तर पुढे वंस बसवने. कोलापुरचे न करने. चिटणीसास* सरव सागितले तसे करने वंस होईल त्याच्या आज्ञेत चालून राजमंडल चालवने. चिटणीस स्वामीचे इसवासू त्याच्या तुमच्या विचारे राज राखने वंस होईल तो तुमची घालमल करनार नाई. सुदन असा

**यादी—२**

श्री

राजमान रा बालाजी पंडित प्रधान—

आज्ञा जे—राजभार तुम्ही चालवाल हा भरवसा स्वामीस आहे. पहिले सागितले खातरजमा ती चिटणीसानी अढळ केली तुमचे मस्तकी हात ठेविला आहे. वस होईल तो तुमचे प्रधानपद चालवील करील अंतर त्यास सफत आसे त्याचे आज्ञेत चालून सेवा करने. राज राखने. बहुत काय लिहिने, सुदन असा

---

## ३०

**पे. द. भा. २५ लें० १२१ ]** [ ८ एप्रिल १७५१

# " निजानंद लेखन "

**[ या पत्रांतील भाषाशैली विशेष लक्षांत ठेवण्याजोगी आहे. ]**

राजश्री पंतप्रधान गोसावी यासी,—

श्रीमंत सद्गुणनिधान कृपाविधान प्रतापवरीष्ठाभिधान निरंतर भगवदनुसंधान सावधान श्री माहाराव जानोजी जसवंत निंबाळकर § दंडवत विनंती उपर

---

* गोविंदराव चिटणीस शाहूचा एकनिष्ठ सेवक. § हा निजामाकडील मराठा सरदार, यास महाराव असा किताब होता.

येथील क्षेम ता। छ २२ जमावल मु।। भागानगर जाणोन निजानंद लेखन कीजे विशेष. राजश्री रघोजीबावा भोसले येथोन ती कोसावर येऊन उतरले आहेत हे वर्तमान विस्तारे राजश्री भगवंतराव राम व राजश्री मनोहरपंत वकील यानीं लिहिले आहे त्यावरून विदित होईल आजी उद्या आम्हास निरोप होणार आहे. आविलंबेच आटोपून येतो निरंतर स्ववैभवातिशये लेखकास लेखनाज्ञा करून लेखन जाल्या मन संतोशैकनिकेतन होईल. विशेष लिहिणे हेच विनती.

---

## ३१

**प. द. भा. २५ ले० १४६ ]** [ ऑक्टो. १७५२ ?

## " आमच्या सांभालाचा अभिमान "

**[ तोरगळकर तुळजाबाई सिंदे हिचें खालील पत्र भाषेच्या व राज्यकारभाराच्या दृष्टीनें महत्त्वाचें आहे. तुळजाबाईसारख्या कित्येक स्त्रिया त्या वेळीं राज्यसंरक्षणाचे कामीं कशा उत्सुक होत्या आणि छत्रपति व पेशवे यांजबद्दल सरदारांची भावना किती अनुरक्त होती हे यांत दिसून येतें. ]**

श्रीशंकर

राजश्री पतप्रधान गोसावी यासी,

श्रीमंत अखंडित लक्ष्मी अलकरण राजमान्य विराजित स्नो। तुलजाबाई सिंदे दंडवत विनंती उपरी–येथील कुशल जाणऊन स्वकीये कुशल लेखनाज्ञा करून आसीर्वाद पत्री साभालावे विशेष. आपणाकडील आसीरवादपत्र बहुत दिवस येत नव्हतें. याजकरिता अमृतोतराची प्रतीक्षा सदैव सापेक्षित असता साप्रत आनंद-रूप आसीरवाद ( पत्र स्वामीने आम ) चे नावे पाठविले ते ( मस्तकी वदून ) चितास परम आल्हा . . . पत्रावलोकनी आपले चरणाविंदच अवलेकनात आले आज्ञापत्री आज्ञोत्तरे लिहिली की नवाब आमीरुल उमराव निजामनमुलक गाजुदीखान बाहादर फेरोजंग दक्षणेस सुबेदार होऊन औरंगाबादेस दाखल जाले सारी पातशाही मनसबदार दक्षणेच्या सुबियाचे ताबे आहात आपले जमियेतीनिसी पत्रदर्शनी औरंगाबादेस जाऊन नवाबाची मलाजमात करणे यात

तुमचा गैर सरफाराजी व बेहबुदी * असे, तरी जलदीने येणे म्हणऊन आज्ञापिले त्याजवरून परमसंतोश जाला. येसियासी आम्हास आपली आज्ञा वंद्य आमचे मुरबी सर्व प्रकारे पूर्वीपासून गोसावी समर्थ आपले सिरी आहेत; आणि सर्वस्वे आपल्या साभालाचा आभिमान गोसावियासीच वडिलवडिलापासून आमचा साभाल होत आला. तीर्थरूप कैलासवासीनी महाराज छेत्रपतीची सेवा येकनिष्ठपणे करून कृपा संपादून घेतली होती. पुढे अनाथकरुणानुबंध कैलासवासी † या राज्यात अलियावरीही छेत्रपति व कैलासवासी थोरले पतप्रधान सर्व प्रकारे साभाल करीतच आले आता आमच्या साभालाचा अभिमान गोसावियावाचून आणिक कोणास आहे ? आपल्या आज्ञेप्रमाणे जमियेत सुद्धा चिरंजीवास यावया विलंब नाही आमचे वर्तमान राजश्री घोडाजी आकदेव सेवेत निवेदन करिता अवगत होईल, आणि पत्रीही विज्ञति की चिरजीव गत वरषी न्यामतुलाखांजीचे हामराह करनोलच्या मोहिमेस रवाना केले ते करनोलची मोहिम करून न्यामतुलाखाजी बराबरीच भागानगरास दाखल जाले आम्हीही चिरंजीवास गोसावियाच्या आज्ञापत्रा आगोधरीच पत्रे लेहून पाठविली की तुम्ही लवकर येणे. इकडे नवाब निजामनमुलक फेरोजग बाहादर औरगाबादेस दाखल जाले म्हणऊन पहिलेही पत्रे लिहिली आहेती आणि गोसावियाचे आज्ञापत्र आलियावरीही मागती पत्रे लेहून पाठविली तेही लवकरीच येऊन पोहचतील.

विशेष विस्तार काय लिहिणे हे विनंती

## ३२

राज. खं. ३ ले०—१३७ ] [ २३ सप्टे. १७५५

## " आम्ही कान धरली शेळी "

**[ उत्तर हिंदुस्थानच्या कारभारांत गोविंदपंत बुंदेल्यानें काय कामगिरी केली त्याचें रसभरीत वर्णन पुढील पत्रांत त्यानें कळविलें आहे. ]**

---

* भरभराट † कै० शाहू महाराज.

श्री.

श्रीमंत राजश्री पतप्रधान स्वामीचे सेवेसी,—

विनंती सेवक गोविंद बल्लाळ . कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ता आश्विन वद्य ३० पावेतो स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष.

इकडील वर्तमान एकदोन पत्री सेवेशी लिहिले आहे, त्याजपासून विदित जालेच असेल व चिरजीव बाबूराव ¦ याणे विनती केलीच आहे रा गोपाळराव† याजविशी आज्ञापत्र सादर जाले, त्यास राजश्री दादा स्वामीचे § आज्ञापत्र आले त्यास आम्हास श्रीमत रा दादासाहेब स्वामीनी आज्ञा केली ते प्रमाण गोपाळराऊ याजला राजी करतो मीही येथील बदोबस्त करून येतो इकडील नवा मजकूर राजश्री जयाजी शिंदे यास मारवाडकरानी दगा केला, हे वर्तमान जमिदारास कळताच मन माने त्याप्रमाणे लबाडीस आले सकुराबाद, इटावे याजकडे जमिनदाराशी झुज मातबर आम्हाशी जाले. पधरा सोळा घोडी पडली, भले माणूस ठार झाले स्वामीचे प्रतापे गवार × मारून कहाडिले परतु हा मुलूख कोतादेशी गवार आहे सभावती पठाण जागा विकट रयत म्हणावी तर रजपूत हे गत आहे आमचे तैनातीस फौज रा अताजी माणकेश्वर याजकडील देविली त्यास त्याजला रा दत्ताजी शिंदे याजकडे मारवाड प्राती जाणे तेथेहि जरूर गेले पाहिजे, जाणून निरोप दिल्हा श्रीमत रा दादा स्वामीनी रसदेचा ऐवज चार लाख पासष्ट हजार त्याजला देविला त्याप्रमाणे निकडीने त्याजला जाणे, सबब सत्वर भरून दिल्हा चार लाख पासष्ट हजार शिवाय नव्वद हजाराची वरात फफुंद व इटावे, सुकुराबाद ऐवजी तेही दिल्ही, सालमजकूरची रसद सुकुराबाद, इटावे, फफुद येथील रसद भरून दिली, त्याची कबज सेवेशी पाठविली आहे मी चाकर बारगीर स्वामीचा आहे जे मेहनत कुरा कडा ɸ येथे केली, जिवाकडे न पाहिले, आणि मोगलाशी झुंजलो, स्वामीचे प्रतापे बोलबाला जाला सुभा मातब्बर होता त्यास जागा सुटली, स्वामीचे घरी आली जर जागा गोपाळराव यास देणे होती तर मजला बोलावून हुजूर नेऊन जे आज्ञा करणे ती करावी होती मी हुकुमी स्वामीचा आम्हास

उपनाव खेर बुंदेले ¦ लेखकाचा धाकटा बधु † गोपाळराव बर्वे § रघुनाथराव दादा पेशवे याचे. × बडखोर ɸ कुरा कोडा हे अलाहाबाद नजीकचे दोन प्रांत

उजूर काय? परतु कुरा कडेयात माझी प्रतिष्ठा, आबरू स्वामीनीच बसावेली स्वामीचे जोराने वजीर रजवाडे याजला मी खातरेस आणित नाही त्यास अबरूने जालियास स्वामीचाच नक्ष रहातो. श्रीमत राजश्री दादा स्वामीची आज्ञा ते आम्हास प्राणादाखल आहे त्याचे आज्ञेत उजूर करीत नाही मी त्याचे आज्ञेप्रमाणे वतर्णूक करून पुणे यास येऊन श्रीमंत रा. दादा स्वामीजवळ विनंती करणे ती करीन आम्ही चाकर स्वामींचे कमाऊ आहे. स्वामीचे चार पैसे खराब करावयाचे नाही गठडी एक जागा असती तर स्वामीस कळते की, चाकरी फलाणेयाने केली असे स्वामीस विदित होते आता स्वामीची आज्ञा शिरसा वंदून येथील बंदोबस्त करून सेवेशी येतो उरूबरू येऊन विनंती करीन. मजला मोठी उमेद आहे, स्वामीची चाकरी उमेदपणे करावी, आणीक जागा, मुलूख स्वामीचे घरी फार आणून घालावा हे आहे त्यास माझी नालीस नाना प्रकारें स्वामीस लिहिणार लिहितात त्यास जर मी स्वामीची सेवा एकनिष्टपणें करीत असलो तर आमचे कल्याणच आहे जर काही दगाबाजी करूं तर ईश्वर आम्हास शिक्षा करील आम्हास एक स्वामीची कृपा हिमायत * म्हणावी तर, वशिलावगा म्हणावा तर, स्वामीखेरीज आमची गोष्ट बरी सागेसारखा कोणी नाहीं बकरुलाखान पातशाहीत नामी सरदार होता, त्याजला परम संकटे परम उपायें जिवाकडे न पहाता बुडविला त्यास मराठा सरदार हे कर्म करिता तर जमीनीवर न माता ! आम्ही स्वामीचे ब्राह्मण, आमची शिफारस कोण करणार? आज दोन लाख रुपयाचा तोफखाना स्वामीस मिळवून दिल्हा कुरा व कडा अठरा परगणे, लहान थोर स्वामींच्या घरी आले पातशा कोठील? वजीर कोठील? जे जागा घेतली ते स्वामीनी कोणास दिली? हे चाकरी सेवकापासून झाली काही नादानी आम्हापासून न जाली येथून लिहिता विस्तर आहे आम्ही कान धरली शेळी आहो, हुकुमी आहो खावंदाची अहिर्निशी सेवा एकनिष्ठपणे करावी हें जाणतां नालीस आमची हजारो कोणी लिहू, करू आम्ही त्रिशुद्ध एकनिष्ठपणे वर्तणूक केलियास काही फिकीर नाही. मीही येथील बदोबस्त करून सेवेसी येतो सेवेसी येऊन तपशीलवार वर्तमान विदित करीन, तेव्हा स्वामी ऐकोन संतोषी होतील, आमचे श्रमाचे सार्थक होईल सविस्तर चिरंजीव बाबूराव याजला लिहिले आहे, ते विदित करतील राजश्री दत्ताजी शिदे याची मदत जरूर स्वामीनी करावी. राजे माधोसिग याणी गोविद तमाजी जिवे मारला;

* आश्रय, आधार

आणि दहा हजार फौज सागरेकडे गेली म्हणून वर्तमान आहे विजेसिग याचे साहित्य करावे म्हणून गेले आहेत आहे वर्तमान ते लिहिलें आहे वरचेवर लिहित जाऊन आम्हास उजूर: तिळमात्र नाही प्राणसुद्धा स्वामीचे आज्ञेवर हजर आहे आज्ञेशिवाय नाही जागा ते कितेक जीव सुद्धा हजर आहे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

---

## ३३

**पे. द. भाग ४३ ले० ६ ]** [ २४ जाने० १७५६

## ॥ तिलोतमाच्या लावण्याचे तीळ ॥

**[ मकरसंक्रमणाचे तीळ पाठविण्याची वहिवाट मराठशाहींत सार्वत्रिक होती. अशा पत्राचा हा एक चमत्कृतिजन्य मासला आहे ]**

श्री

राजश्री पंतप्रधान गोसावी यासी,

छ श्रीमत सद्गुणनिधान कृपाविधान प्रतापवरिष्ठाभिमान निरंतर भगवदनुसधान सावधान श्रो। माहाराव जसवंत निबालकर दडवत विनती उपरी येथील क्षेम ताा छ २१ राा ग्वर + + + ज निजानंद लेखन कीजे विशेष कृ . . . पत्र संक्रमाणाचे तिलशर्करायुक्त पाठविले ते पावोन परम समाधान जाले. कितेकानी या तिळाचे लावण्य पाहून तिलोतमाच्या लावण्याचे मूळ हेच तीळ असतील ऐसे मानिले अस्मत् चिताने कृपा श्नेहमये जाणोन आवडीने शर्करासहित सेविता रसनेस गोडी व चितास प्रतिक्षणी अभिवृधि लक्षणी श्नेहवशता प्राप्त जाली, तो विस्तर लिहिणियाहून विशेषतर असे हे विनती

---

* हयगय

३४

पे. स्फु. ले भा. ४ ले० ११ ] [ ४ मे १७५८

# मराठ्यांचा हिंदबाहेर दृष्टिक्षेप

**[ मराठ्यांची सत्ता सार्वभौम बनूं लागली, तेव्हां त्यांच्या सेनानायकांचा दृष्टिक्षेप कसा वाढत गेला हें रघुनाथराव दादांच्या खालील पत्रांत दिसून येतें. ]**

श्री

"सेवेसी विज्ञापना लाहोर, मुलतान, काश्मीर वगैरे सुभे अटकेअलीकडे, येथील बंदोबस्त करून अम्मल बसवावा त्यास, काही जाला, व काही होणे तोही लवकरच करितो अहंमदखान अबदाली याचा पुत्र तैमुर सुलतान व जाहाखान याचा पाठलाग सरकारचे फौजेने करून त्याची फौज लुटून घेतली. काही थोडीशी फौज झडत पडत अटकेपार पिशावरास जाहानखान व तैमुर सुलतान पोहोचले खासा अबदाली इस्पहा इराणचा पादशहावरी फौज सुद्धा चालोन गेला होता, त्यास इराणचा पादशहा जबरशाहा तिकडून अबदालीचे फौजेवर चालोन येऊन हल्ला करून काही फौज लुटून घेतली खासा अबदाली मात्र बारा, चौदा हजार फौजेनिशी इस्पहानातून अलीकडे कंधारास आला इराण्याची फौज याचा पाठलाग करीत आली आहे जबरदस्तखान व मुकरबखान वगैरे सरदार व जमीनदार त्या प्रांतीचे अबदालीचे जबरदस्तीमुळे रुजू होते, तेही बदलोन हंगाम करितात हल्ली त्याच्या अर्जी, रफीक ‡ होऊन सेवा करून दाखवून अबदालीस तबी करूं ऐशा आल्या आहेत चहूंकडून अबदालीवर हंगाम जहाला आहे याजमुळे त्याचा धर सुटला आहे सबब हिरातेत गेला तर अबदालीस धर धरवत नाही साराश, अबदालीचा जोरा तिकडून होतो ऐसे नाही त्याचे साहित्य उपराळा कोण्ही करिता दिसत नाही इरानचे पातशाहानी तिकडून फारच जेरदस्त केले आहे इकडून जोरा पोहोचावून सरकारचा अमल अटकेपार करावा अहंमदखान अबदाली याचा पुतण्या अबदुलरहीमखान अबदालीचे दौलतेचा वारीस स्वामीपाशी देशास आला, तो स्वामीनी आम्हाकडे पाठविला होता त्यास अटकेअलीकडे काही थोडीशी जागा

‡ स्नेही, दोस्त.

बसावयास देऊन अटकपार काबूल पिशावरचा सुभा देऊ अबदालीची फौज अबदुलसमदखान सरहिंदेत होता तो पाडाव सरकारात आहे तो व आणखी या प्रान्तींची फौज इरानी मोगल येऊन देऊन मशारनिल्हेची रवानगी करितो हे तिकडील बंदोबस्ताची पैरवी करितील स्वामीचे पुण्यप्रतापे अबदालीस जोरा पोहोचाऊन तंबी करितील, पारपत्य उत्तम प्रकारे करून अटकेपार अमल बसवितील लाहोर प्राती राजश्री रेणको अनाजी व रायाजी सखदेव ऐसे ठेविले गोपाळराव गणेश याचाही पैगाम† आहे तेही राहातील याजशिवाय आणखी किरकोळी पथके ठेवितो स्वामीचे पुण्यप्रतापे बदोबस्त उत्तमच होईल पुढे स्वदस्तुर इरानचे पातशाहाचे कागदही आम्हास व मल्हारबास आले होते की, लवकर कंधारेस यावे, आणि त्याचे पारपत्य करून अटकेची हद्द करावी, ऐसा मजकूर आहे परंतु आम्ही तरी काबूलचा सुभा अबदुल रहीमखान स्वामीनीं पाठविला, त्यास देतो फौज वगैरे थोडेबहुत साहित्यही करितो काबूल व कंदाहार हे अटकेपारचे सुभे हिंदुस्थानकडे अकबरापासून आलमगीरपावेतो होते ते आम्ही विलायतेत का द्यावे ? यास्तव तूर्त येथे सुभे देतो त्यासही फारसे या सुभ्याची दरकार नसेल तो इरानचा अंमल करील आम्ही कदाहार पावेतो अंमल बसवून तूर्त त्यास गोडच जाब पाठविणार आहो लटी व जंबूचा राजा व काश्मीर वगैरे तमाम वकील आले आहेत मामलत थोडोबहुत अटकेअलीकडील करीत आहो पलीकडील तूर्त होत नाही खटपट मात्र होईल तूर्त तातडीमुळे जे होईल ते करितो पुढील स्वारीस जो कोणी सरदार मातबर येईल तो बदोबस्त करील मुल्ख दो चौ करोडीचा वसुली, परतु जमीदार मवास मोठे मोठे आहेत आम्ही नावास मात्र खंडणी करितो जेथे पंचवीस लक्षाचा मुल्ख, तेथे एक दोन लक्ष देणेच कठिण आहेत तूर्त माघारे फिरावयाचा डौल स्वामीचे आज्ञेवरून धरिला आहे त्याजमुळें जे होते तेच करितो तटी ‡ लावीत नाही. तूर्त या प्रान्ती आदिनाबेग मोगल मातबर व प्रामाणिक आहे त्याजवर मारा यकतियार $ दिल्हा आहे लाहोर मुलतान यासच कमाविसीनें दिल्हे आहे यंदा तर सारे काही सोईस लागेल स्वामीस कळावे रवाना छ २५ साबान मुक्काम लाहोर बहुत काय लिहिणे हे विज्ञापना

* व्यवस्था, खबरदारी. † मधान. ‡ हट्टास $ भरवसा.

## ३५

**खरे. ऐ ले. सं. ले० १५.]** [ १ एप्रिल १७६०

# दौलताबाद तुम्हास दुर्घट वाटत्ये

**[ पटवर्धन घराण्यांतील शूर व रागीट पुरुष गोपाळराव गोविंद यास पेशव्यानें दौलताबाद हस्तगत करण्यास पाठविलें असतां त्यानें एकदम हल्ला न करतां राजकारण चालविलें, त्याबद्दल पेशव्यानें त्यास पुढील ताशेरा लिहून पाठविला आहे. सरदारांचे गुणदोष ओळखून त्यांजकडून कामें घेण्याची पेशव्याची हातोटी यांत व्यक्त होते. ]**

श्री

पुरवणी. राजश्री गोपाळराव गोविद स्वामी गोसावी यास नमस्कार विनंती उपरी. वारवार लिहिता की, ही स्थळे दुर्घट आहेत, शहास गुंतता येत नाही, विचारे कार्यसिद्धि करावी लागत्ये, यास्तव हल्ला राहविला म्हणोन लिहिता हे बहुत अपूर्व वाटते. विचार दूरंदेशी † तुम्हासच कळते हे पूर्ण प्रत्ययास येऊन गेले. परंतु हे राजकारण प्रथम नरम धरिलेंत, रस्त ‡ बंद न केली, ये गोष्टीची तारीफ चिरंजीव भाऊ वगैरे सर्व शहाणे तुमची फार करितात तुम्हास स्थळें अवघड वाटतात, परंतु श्रीकृपेने तृणप्राय आहेत मल्हारबानीं धोडप हल्ला करून घेतली ते स्थळ हल्ला करून यावयाचे होते ? कालच्या मोगलावर उभयता चिरजीवानी सफेजगी . केली, एका लढाईत मोगल चक्काचूर केला, हे कोणाचे तर्कांत येत होतें ? लाखो असाध्य कामे श्रीकृपातेजप्रतापापुढे तृणप्राय आहेत परतु करणारा-सारखे फल होते तुम्ही सखूत जलद शिपाई असे जाणून मी तुम्हास पाठविले होते. तुम्हीच आम्हास विचार लिहिणार, इतकेच कळले असते तर एकादे लहानसहान पथके पाठविले असते तो प्रथम दिवशी रस्ता बंद करिता. काहीच द्यावयाचे न बोलता, म्हणजे आज काम जाहले असते तुम्ही मातबर, तुम्हास कार्य जाहल्यावाचून आणता नये, यास्तव तुम्हास यश यावें म्हणून तुम्हासच आज्ञा करितो, ते तुम्ही करीत नाही, ये गोष्टीस इलाज कोणता करावा ?

---

† दुरदेशी = दूरदृष्टी, पुढचा पेंच. ‡ रस्त = रसद, दाणापाणी.
सदाशिवराव भाऊ व रघुनाथराव दादा. [¹] यशस्वी संग्राम.

गोपाळरावजी ! हे दौलताबाद तुम्हास दुर्घट वाटल्ये, परतु दो महिन्यात सखूतीने वेढा घालून एक रुपया न देता घेऊं का की त्याची कुमक कोणी करीत नाही मोगलाने कुमक केली तर पुनरपि श्रीकृपेने पन्नास हजार फौज जमा करून अगदी मोगल दक्षिणेत होता की नव्हतासा करू हे मोगल समजले आहेत तुम्ही समजत नाही यास इलाज काय करावा ? तुम्हास बहुत दूरदेशी समजते रागे भरून लिहिले म्हणोन तुम्हास आता राग येईल परंतु तुम्ही वारंवार आम्हास विचार लिहिता यास्तव लिहिणे प्राप्त जाहले या पत्रापूर्वी कार्य जाहले असेल तर उत्तम आहे नाही तर परिच्छिन्न § शहरपन्हा $ घेऊन वेढा बसविणे श्रीकृपेने कार्य होईल जों जों तुम्ही राजकारणे करिता तों तों काम नासते. या उपर या पत्रावरून जितका राग येईल तितका त्याजवर काढणे जर कार्य जाहले असेल तर मग व्यर्थ राग येऊं न देणे तुमचा स्वभाव रागीट, यास्तव इतके दिवस सखत लिहिले नाही आता वारंवार तुम्ही विचार लिहू लागला तेव्हा लाइलाज ‡ जाणून लिहिले आहे हे पत्र कोणास ठाऊक नाही. लेकरा-दाखल सेवकावर एकांती रागे भरल्यास वाईट मानूं नये. छ १४ साबान हे विनंती

---

## ३६

**ऐ. टि. भा. २ ले० ३३.**] [१८ एप्रिल १७६०

## " तैमूरच्या सलतनतेचा नाश कर्तव्य नाहीं "

**[ सदाशिवराव भाऊची रवानगी स. १७६० सालीं अब्दालीवर केली त्यावेळीं त्यास काय ताकिदी होत्या आणि त्या स्वारीचे एकंदर उद्देश कसे होते, या गोष्टी पुढील पत्रांत स्पष्ट कळतात. पानपतावरील प्रसंगाचें निदान समजण्यास या पत्राचे साह्य होते. ]**

**श्रीगजानन**

" राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोपाळराव गणेश स्वामी गोसावी यासी पोष्य सदाशिव चिमणाजी नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून

§ निःसशय $ शत्रूने आश्रय केलेलें शहर ‡ नाइलाजास्तव.

स्वकीय कुशल लिहीत जाणे. विशेष तुम्ही छ २५ रजबची पत्रे पाठविली, ती छ २७ साबानी पावली आबदालीचे वर्तमान व सरदाराकडील व बंगल्याकडील वगैरे कितीएक लिहिलें, तें कळले ऐशास प्रस्तुत सरदार कोठे आहेत? आबदाली कोणे ठिकाणी आहे? मनसबा काय करितात? हे सर्व बारीक मोठे शोध करून वरिचेवरी जलद जोडीबराबर लिहीत जाणे खासा स्वारीही देशी मोगलाचें पारिपत्य यथास्थित करून, मजल दर मजल हिंदुस्थानात अबदालीच्या पारिपत्याकरिता येत आहे छ २९ साबानी हंडीयाचे घाटे नर्मदा पार जाहली. मातबर फौज सुद्धा सुरोज खेचीच्या मार्गे दरकूच येत आहे सरदाराच्या भेटीनंतर पोख्त मनसबा होऊन सर्व गोष्टी यथास्थित होऊन येतील तुम्ही चहूकडील वर्तमान यथातथ्य बारीक मोठे वरिचेवरी लिहीत जाणे या गडबडीमुळे आम्ही राऊत, प्यादे, शिबंदी ठेवून, अंमलठाणी हा कालवरी रक्षिली, जरी शिबदी नसती ठेवली, तऱ्ही अंमल उठला जाता, गडबड वारे तो शिबंदी दूर करिता येत नाही म्हणून लिहिले ते कळले ऐसेयासी शिबंदी ठेउन अंमल राखिला, हे बरेच केले आन्नापि बदोबस्त ठीक होय तो कार्याकारण शिबदी राखून सावध राहाणे सुज्यातदौलाच्या मनात गडबड करावयाचे आहे, दबावितात म्हणोन लिहिले, तऱ्ही त्याचेही पारिपत्य लौकरच होऊन येईल सुजातदौला याणी पहिल्यापासून स्नेहानेच वर्तन राखिले आता हे गोष्टी मनात न आणावी तुम्ही मागे त्याचेविषयी फार बोलत होता त्यास साप्रत तैमूर याची पातशाही गारत आबदालीने केली, म्हणजे अमीर रजपूत आहे याची पातशाहात घ्यावयाशी राहील की काय? जेथे लहानाचे थोर, दोन दोन पिढ्या तीन तीन पिढ्याची पातशाही राखावयाशी आम्ही झुंजतो भाडतो, हे जर या गोष्टीची फिकीर मनात न आणीत, तरी यामुळे आबदाली काय मनात आणील, इतबार कसा पडेल, हे कळतच आहे अखेर आम्ही जबरदस्त, आमचा पेच त्यास आहे, तो जर स्नेहाने वर्तला तर त्याचा आमचा काय दावा आहे? परंतु तो आम्ही एक होऊन, तैमूर याचे सलतनतेचा नाश करावा हें आम्हास योग्य नाही, व हे सारे आमचे स्नेही यासहित सर्वांचे वाईट हिंदु धर्म, व तैमूर याचे काहीच नाही असे होणे हे आमचे पाहिल्यात कसे होईल? व याणीही हीच गोष्ट मनात आणावी कमर बाधून आम्हास व सरदारास येऊन सामील व्हावे घरचे पेच असतील ते त्याचे आमचे विचारे दूर होतील परंतु हा शत्रु नाहीसा करावा हेच त्यास

योग्य या अन्वये त्याशी भाषण करणे हें तुम्हास सवड असली, काही अनुसंधान असले, तर ठीक करून बमयफौज † यावे दुसरा विचार न करावा, हेच करवणे सुजातदौलाचे मार्फतीनें नजीबखान रोहिल्याने आलीगोहर यासी राजकारण काहीं लाविले आहे की काय किंवा नाही ? आलीगोहर कोठें आहेत ? त्याची फत्ते कशी जाहली ? पुढे काय विचार करितात ते सर्व लिहिणे तुम्ही तिकडील जे जमीनदार वगैरे असतील, ते सर्व आपले लगामी लावून, त्याजपासून आबदालीचा अंमल तिकडे होऊं न पावे ऐसे करणे आपला अंमल ठासून राखिला, उत्तम केले पुढेही याच प्रकारे करणे जाणिजे छ १ माहे रमजान सु॥ सितैन मया व अलफ नारो खंडेराव व पाचशे राऊत शहाजादीयाजवळ तुमचा आहे त्यास उत्तम आहे त्यास येथून आलिगोहरास लिहिले आहे की, सारे अमीर व रजवाडे राजे यासी पत्रे, फौजसुद्धा आम्हास येऊन सामील व्हावें, ऐसें पाठवावयाविषयी लिहिले आहे तरी ही पत्रे तुम्ही लेहून सत्वर येत असे करणें. व परभारेही असेच लिहिले आहे शहाजादीयाने तिकडील बंदोबस्त करून सत्वर यावे पातशहात दिल्लीस कायम करून परकी शत्रु नाहीसा करावा मग घरचा बंदोबस्त सहजात होईल तरी हाही मजकूर लिहिणे, डौल धरावा वारंवार बातमी बारीक लिहीत जाणे जाणिजे छ १ रमजान बहुत काय लिहिणे ? हे विनती

३७

**पे. द. भा. २७ ले० २५५ ]** [ २६ जून १७६०

## पानिपत स्वारीची आर्थिक कुचंबणा

**पो छ १६ जिल्हेज इहिदे**

**आधिक श्रावण.**

**[ पुढील पत्र सदाशिवराव भाऊने पेशव्यास लिहिलेले असून त्यांत पानिपत स्वारीचा आर्थिक कारभार कसा चालला आणि पैशासंबंधानें सदाशिवराव भाऊची कुचंबणा कशी होती याचे वर्णन आहे. ]**

† फौज सहित

श्री

शेवेशी विनंती. सन इहिदे शितैनच्या हिंदुस्थान प्रातीचे मामलेदारांकडे रसदाचा ऐवज येणे ऐशियास, आम्हाकडे ऐवज पाहिजे, यास्तव इकडेच ऐवज घ्यावा लागतो मामलेदारास ताकीद होऊन इकडेच ऐवजाचा भरणा करावयास आज्ञा केली पाहिजे आबदालीच्या मसलतीमुले रसदाचा पैका घ्यावा लागला शहास गुतल्याने दुसरा पैका कोठे मिलणे कलतच आहे. घरचा पैका व कर्ज खावे लागले त्यास येकंदर जमेचा व खर्चाचा अजमास करून देशी पैका जमा व्हावा त्यास खर्च लाऊन तो अजमास व आमचे स्वारोकडील जमेचा व खर्चाचा अजमास करून दोन्ही अजमास पाठविले आहेत. मागील बाक्याचा ऐवज देशी हिंदुस्थान प्राते येणे आहे त्यास हिंदुस्थानात आबदालीचा दंगा जाला यामुले सालमजकुराचा अंमल यथास्थित चालोन ऐवज माहालचा वसूल जाला नाही व गारा व थडी पडली यामुले जागा जागा माहालास तोटे आले नवे जुने मामलतीची घालमेल जाहाली, यामुले बाकीस ठिकाणच नाही. गोविंद बलाल याजकडील बाकी सालेसाल वोढणीची ओढत आली. बहुतच तपशील आहेत. त्याही मध्ये निकड करावी अगर मागील चौकशी करावी तर गडबडीमुले चौकशी होत नाही आबदालीचा पेच वारल्यावर जे होणे ते होईल साल मजकूर सन इहिदेचा लहानमोठे मामलेदाराचा रसदेचा व पुढील अखेर साल तागाईत आम्ही आपणाकडे नेमिला आहे त्यास खर्च फार, जमा थोडकी त्याहीमध्ये विचार पाहाता केवल वरचा पैका जामादारखान्यातील खावा असाच प्रसंग प्राप्त जाहाला. त्यास स्वामीचे प्रतापे करून पारपत्य पठाणाचे लवकर जाहाल्यास हिंदुस्थानचे माहालचा ऐवज फारसा आम्हाकडे लागणार नाही स्वारीशिकारीमुळे खंडणीचा ऐवज आकारेल पठाणाचे पारपत्य जाहाले तरी दसरापर्यंत बाहेरील कोठील पैसा मिलणें कळतच आहे दिल्लीकडे आलो. या प्रातात फौजा नेहमी आहेत, त्यामुळे मुल्क वैराण बहुत जाला जाटाकडे खंडणीचा पैका येणे त्यास या समई जाटास मागता येत नाही. जयनगरवाले याजकडील पैका येणे कळतच आहे मसलतीमुळे अडचण पडली, त्यास या प्रातीचे माहालकरी याजकडील येकदर भरणा तेथे रसदेचा न घ्यावा कदाचित् कोणी माहालकरी याचा इकडे भरणा करावयाचा सावकार नसेल त्यास सागोन उज्जनी, इंदूर या ठिकाणच्या हुंड्या घेऊन पाठवाव्या देसचा जमेचा व

खर्चाचा अजमास करून पाठविला आहे व मागील शितैनची माहालकरी याजकडे बाकी राहिली आहे, त्यास हिंदुस्थाना प्रो। तिकडील तपशील नाही फडशे माहालकरी याचे जालियास काही ऐवज वसुलात येईल सन इहिदेची जमा व खर्च लिहिला आहे त्यास सरासरी पाहाता खर्च जाऊन बाकीच राहावी असा अजमास आहे फौजेचे खर्चाचे दोन प्रकार लिहिले आहेत त्यास मसलत पडल्यास तीस हजार फौज लागेल नाही तर काहीच गुंता नाही अबदालीचा पेच उलगडलियावर देशी काही मसलत पडणार नाही पठाणाची मसलत लांबली तर आम्हाकडे खर्च भारी व आपणाकडे खर्च भारी होईल इकडील स्वारीचे लोकास निजामअलीचे झुंजात घोडी पडली व रोगाने बहुत मेली, यास्तव घोडे घ्यावयास थोडे बहुत जरूर द्यावे लागते शितैनची रवानगी लोकास द्यावयाची, त्यास पोटास रोजमरा पुर्ता मिळत नाही तेव्हा रवानगी व नालबंदी कोठील ? दिल्लीकडे दंगा जाहाला यामुळे इकडील सावकार परागंदा जाहाले कर्जवाम कोठे पैसा मिलत नाही स्वामीच्या प्रतापेकरून पठाणाचे पारपत्य लौकर जाहाले म्हणजे सर्व गोष्टी उत्तम आहेत जिकडे कामास जावे तिकडे मेलवावे, खावे, रड ल्याहावी उत्तम नाही परंतु दतबा पडल्यापासून फार रोज कजिया होऊन बखेडे बहुत जाले सलावत त्याची वाढली त्याचे पारपत्य जाले तर दसऱ्यापर्यंत ऐवज कोठील मिळणार ? कर्जासही सावकार सर्व जागा जागाचे निघाले इकडील रसदा इकडे देवविल्या तर देशी कर्ज वारून ऐवज अधिक आहे च्यार यादी होत्या त्यावरून अजमास इकडील व देसचा जमाखर्चाचा बारमाही लिहिला आहे दाहा वीस लाख अलीकडे पलीकडे जमा कम तर काही कलमाची जाजती होईल सर्व अर्थ ध्यानात आणून रसदाचा ऐवज इकडे द्यावयाविशी मामलेदारास ताकीद करावी येथून पत्रे पाठविली आहेत यंदाचा मनसबा विलक्षण, यास्तव लिहिले. नाही तर घरचा पैका खावा तो फार वाईट वाटतो इलाज नाही यास्तव सेवेशी लिहिले आहे. येथेंही मामलेदारास ऐवज इकडेच भरणा करावा म्हणून ताकीद केली. पूर्वी याच मजकुराचे पत्र पाठविले आहे ते पावेल न पावेल यास्तव दुसरियानें विनंती लिहिली असे रा। छ १२ जिलकाद बहुत काय लिहिणे हे विनंती

---

## ३८

**का. सं. प. या. ले. १८३ ]** [ १९ एप्रिल १७६०
**पो। छ. २२ रमजान**

# लाडके व्हाल तें कामाचें नाहीं

**[ त्रिंबक सदाशिव ऊर्फ नाना पुरंदरे व सदाशिवराव भाऊ पानिपतचे स्वारींत जात असतां रस्त्यांतून हें पत्र महिपत त्रिंबक ऊर्फ बजाबा पुरंदरे यास लिहिलेलें आहे. बजाबा त्या वेळीं लहान दहा बारा वर्षांचा असावा. त्याच्या शिक्षणाची विशेष काळजी पत्रांत दाखविलेली आहे. ]**

**॥ श्री ॥**

चिरंजीव राजमान्य राजश्री बज्याबा यासी प्रति सदाशिव चिमणाजी आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाणे विशेष — तुम्हाकडील पत्र येऊन वर्तमान कळत नाही तरी वरचेवर सविस्तर वर्तमान लिहीत जाणे आम्ही मजल दर मजल नर्मदापार झालो पुढेही दरकूच जात असो घोड्यावर बसणे व लिहिणे पढणे चागले करणे तीर्थरूप बोलावतील तेव्हा पुण्यास जात जाणे फार खेळत न जाणे घरी अबई * मायेने रागे भरणार नाही, लाडके व्हाल ते कामाचे नाही चागले लिहिणे, पढणे, घोड्यावर बसणे करणे छ २ रमजान हे आशीर्वाद

---

## ३९

**पु० द० भा. १ ले० ४००-४१५ ]** [ स १७६१

# भाऊ वांचून दुनिया दौलत व्यर्थ

**[ सदाशिवराव भाऊची पानिपतावर कुचंबणा झाली, त्याची कुमक करण्याकरितां पेशवा नानासाहेब फौजेसह हिंदुस्थानांत ग्वाल्हेर प्रांतीं गेला, तितक्यांत ता. १४ जानेवारी १७६१ रोजीं पानिपतावर संहार झाला त्याची बातमी कळून**

* अबाजी पुरदरे याची पत्नी. तत्कालीन समाजांत तिची मान्यता मोठी होती.

**त्यास परमावधीचा दुःखावेग प्राप्त झाला, तो कित्येक पत्रांत त्यानें नाना पुरंदरे यास लिहून कळविलेला आढळतो. हीं पत्रे स. १७६१ च्या फेब्रुवारी–मार्च महिन्यांतलीं असून, त्यांतूनच खालील मजकूर उद्धृत केला आहे. पत्रांत इतर मजकूर अनवश्यक वाटला तो गाळला आहे. ]**

चिरंजीव राजश्री नाना यासी बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद उपरी एकदा भाऊचे दर्शन घ्यावे हा हेतु आहे भाऊसाहेब अजमेरीस दाखल होऊन त्याचे हातचे पत्र येई तो यत्न करावा अजमेरीस जाऊन आलाजाट पावेतो शोध काढावा मी बहुत माणसे आज पंधरा दिवस तिकडे रवाना करितो अद्यापि पकी खबर येत नाही माधवसिंगास आबदलीने लिहिले–करोड रुपये घेऊन हुजूर येणे, त्यावरून घाबरा होऊन दररोज आम्हास पत्र लिहितो, " आपण बुदीस यावे, मी येतो सर्व रजपूत मेळऊन " आम्ही त्यास इतकेच लिहितो, " आधी तुम्ही चिरंजीव भाऊची भेट अजमेरीस घेणे तुम्ही हिंदु अखेर जाले तरी रजपूत हिंदु सावध व्हा साराश, चिरंजीव भाऊस ईश्वर आणील तेव्हा ईश्वर तुम्हाजवळून सर्व करवील चिरंजीव भाऊ आलियावर मग माझी भेट योग्य मी भेलसेयाहून पुढे चिरजीव भाऊ येई तो येत नाही चिरंजीव आलियावर मग सर्व मनसबे करावे चिरजीव भाऊ या लोकी नसल्यावर मजला लढणे नाही थोडे फौजेने काम होत नाही तपशील किमर्थ लिहिणें " एक भाऊवाचून दुनिया दौलत व्यर्थ आहे त्याचे हातचे पत्र पाहीन तेव्हा माझे बायकोस व मला जीव येईल आता तो वेडेपणे आहो लेक. अल्पायुषी होता, सूर्यमडल भेदून गेला, ते दुःख परमार्थ शास्त्रपुराणे-करून टाकिले परंतु चिरजीव भाऊवाचून दुनिया व्यर्थ मल्हारबा गप्पा मारतील त्या ऐकाव्या, परंतु भाऊ वाचून सकल व्यर्थ नाना, भाऊवाचून दौलत करणें नाही, सवघड झाली तर मग अवघड, म्हातारपणी अशक्ततेत कोठे होते ! महिन्यात घोड्यावर अर्ध कोश बसवत नाही हे माझी अवस्था. अर्धा फाल्गुन पावेतो भाऊची वाट पाहणे. पुढें ईश्वर बुद्धि देईल तैसे करणे.

ग्वालेर किलियास गोहद† फार फटकल आहे तुमचा मुक्काम समीप दबाबास आहेच. आठ पंधरा दिवस मेहनत केलीया गोहद येईसी असलिया घ्यावी रिकामे का बसावे ? विठ्ठलपंतापासून‡ मल्हारबास भर राग आणून

विश्वासराव. † जाठाचा किल्ला. ‡ विठ्ठल शिवदेव.

तुम्ही समेत देऊन करणे चिरजीव भाऊ येईत तो रिकामे बसावें, ते काही काम करावे मल्हाररावास भर देऊन खामग्या गोष्द घेवणे

नाना फडणिसाची मातुश्री वहिणाबाईचा शोध नाही बळवतरायाचा लेक आपा सुखरूप आहे माझे शरीर चिंता, शोक, औदासिन्य, तीन विषे बहुत विवेक केला तरी बाधतात बायको अति उदास, रोड, मौनी, होऊन गेली ते पाहवत नाही गोपाळरायास सर्व टाऊक आहे यास्तव उज्जनीहून कूच करून ओंकारेश्वरास जातो कर्जपटीविशीं सर्वासी रुक्ष बोललो बाबुराव फडणीस$ व रामचंद्रबावाचे रुपयाविशी चिरजीव भाऊसी बोललो, एवढा मजकडे अविचारीयाचे मते दोष माझे मते नाही परतु माहादोबाचा+ सिष्य, त्यास वाईट साक्षरुक्ष/ बरे गोष्टीसही बोलावे एवढा दोष मी त्याचा लहानपणापासून सिष्य यामुळे सख्त त्याचे चतुर्गुणित मी बोलला सर्वानी क्षमा करावी काही चिरजीव सर्व प्रकारे गुणगरिष्ठ होत्सात धैर्य धरून माझे सख्त चालणे सोसीत आले चिरजीव दादाचे तोडावर मी मारली, मिरजेवर ज्यगात स्नान करीत यास्तव, केवळ ईश्वरी सिधयोगी महावीर, मी नामर्द, व्यसनी पापी असता एस केले असता सोसिले धन्य ते कृतायुगस्वभाव पुरुष सोसिले, हे सर्व तुम्हास अवगत असता, आधी उगाच कुतर्क करावा हा भाऊचा जातिस्वभाव तोही आता माझे मते नाही बळवतराव। कर्नाटकात आलियापासून तुम्हास स्मरण माझे सख्त बोलण्याचे राहिले देव जाणत असता हेच कलिकाल दोषसा वाटतो उगेच फार लिहिले वाईट मानू नको हे आशीर्वाद

## ४०

**का. सं. प. या. ले. १९२ ]** [ जुलै १७६१

# नानांचें आत्मचरित्र

**[ नाना फडणिसाच्या आत्मचरित्राचा हा उतारा अनेक दृष्टींनी मनोरंजक वाटेल. त्यांत तत्कालीन भाषेचें प्रतिबिंब तर आहेच, पण शिवाय पानिपत**

$ नाना फडणिसाचा चुलता + महादाजी अबाजी पुरंदरे – पेशव्याचा कारभारी
/ नरमगरम बळवतराव मेहेंदळे – नाना फडणिसाचा मातुल

वगैरे प्रसंगांची हकीकत मनोरम आहे. हे आत्मचरित्र असेपर्यंत पोचविलें गेले नाही ही खेदाची गोष्ट होय ]

## श्रीसांबसदाशिवाय नमः

मी† लहानपणी अज्ञानेकरून आवृत परंतु पूर्वसंस्कारेंकरून देवाची पूजा करावी हा छंद फार याजकरिता मातोश्रींनी मारही दिल्हा परंतु संस्कार दृढ, विद्याभ्यासाकरिता मातापितर जे यांची शिक्षा, तेणेंकरून लहानपणीं अज्ञाना करिता चित्तास फार वाईट वाटून त्यांचेही अनिष्ट चिंतीत असे

दहावे वर्षी विवाह झाला विंचे पडली असता निर्विघ्न केलें मध्ये घोड्यावरून पडला अति अवस्था कठिण, दोन दिवस शरीरभान नाही या प्रमाणे जाले असता गोविंद जो त्याचे कृपेने बरे केलें पुढे पंधरावे वर्षी पित्याचा काळ झाला त्याचे और्ध्वदेहिक ईश्वरें करविले पुढे परंपर सेवाधर्म‡ चालावा या योगें व श्रीमंताची कृपा पुत्रवत् असे जाणून कर्नाटक प्रांती श्रीरंगपट्टणपर्यंत‡ गेला मातोश्री व कुटुंब सहवर्तमान भाऊबरोबर हिंदुस्थानात जाऊन स्वर्गंगा त्रिपथगा भागीरथीचें स्नान त्रिस्थली यात्रा करावी, अंतःकरण शुद्ध होईल, या भावनेंकरून गेलो त्या काळी चित्तास अति वैराग्य याचे कारण शरीरी किंचित पीडा परंतु चित्तास नाही मातेच्या ठायीं भक्ति होत्साता चालला ते नर्मदा महासंगमध्ये स्नान करून एकवृत्तीने ध्यान केले त्या दिवसापासून उत्तरोत्तर वैराग्य अंतःकरणशुद्धीच होत चालली भाऊची ममता विशेष व आवची व्यथा बहुत जाहाली उठावयास शक्ति नाही, रेचन बहुत, ग्लानी फार, तेव्हा कृश जहाले असता मुक्काम श्रीमंतांनी करवावा त्या काळी ईश्वरें आरोग्य केले पुढे दर मजल चर्मण्वती तीरीं गेलो तेथे ग्रहण पडले स्नानदानादिक करून आत्मा पवित्र होत्साता ध्यानकरून कालक्षेप चालत असे पुढे सूर्यतनया यमुना इचे तीरीं गौघाटाजवळ गेलो तेथे स्नानसंध्या करून दोहो दिवसांनंतर मोक्षपुरी श्रीमथुराक्षेत्री गेलो† तेथे क्षौर प्रायश्चित्त श्राद्धादिक करून तदनंतर पुढे

† जन्म–माघ शु० ६, शके १६६३, ता १२ फेब्रु०, १७४२ पिता जनार्दन बल्लाळ भानु. ‡ भानूंचा व पटवर्धनांचा संबंध किती होता हे पेशवे दप्तर पहिल्या असता ध्यानात येईल ; ‡ ही स्वारी १७५७ त आरंभी झाली ... † ह्या सप्त मुक्तिपुऱ्या प्रसिद्ध आहेत —

> अयोध्या मथुरा माया काशी कांची अवंतिका ।
> पुरी द्वारावती चैव सप्तैता मोक्षदायका ॥

भगवान् पूर्णब्रह्म राधाकृष्ण याणे सकल लीला केल्या असे जे वृंदावन, त्या स्थळास गेलो तेथे कालिया डोही कदंबवृक्ष ज्याजवर भगवान् बसून वस्त्रहरण करिता जाहला, त्याच्या शाखा अद्यापि यमुनेत गेल्या आहेत, त्याखाली जाऊन स्नानतर्पण करून तदनंतर गोपीचंदनाचे टिळे व तुळसीच्या माळा घालून भगवंताचे ध्यान करीत होत्साता वृंदावनात अटलबिहारी व कुंजबिहारी व बालबिहारी, राधाकिशोर, गोविंदजी या भगवंताच्या मूर्ती याची दर्शने घेतली. त्यात कुंजबिहारी मध्यान्ह काली चोपाळ्यावर निद्रिस्थ, कपाट लागलेले, परंतु चोपाळ्यावरची दोरी बाहेर ओढीत असत ती आपले हाती ओढून भगवान् जो यास आंदोलन-लीला केली तेथोन शृंगारवट जेथे भगवंते राधेस शृंगार केले तेथे जाऊन वटदर्शन घेऊन पुढे बंशीवटी म्हणजे जेथे भगवंते मुरलीवादन केले, तेथे जाऊन वटाचे दर्शन केले तेथून सेवाबन, कुंजबन ही स्थळे, कुंज कसे की भगवान् लीला करितो असाच भास होत असावा सर्वही वृक्ष छत्राकार, ठेंगणे, भूमिस्थ पल्लव कंटक वृक्षासही परंतु कंटक नाही हे पाहून आनदमय होत्साता यमुना तीरी रेतीत भगवान् जो याणे बालरूपी लीला केली, पादारविंद-संबंधी रेणु रजःकण त्याची प्राप्ति मस्तकी वंदावयाकरिता ब्रह्मादिक देव इच्छितात. तेथे जाऊन लोळून ती रेती मस्तकावर घेतली तेथोन ज्ञानगुदडीस* गेलो तेथें थोर थोर संत, महंत, बैरागी भगवत्पर होत्साते, सायंकाळचे साहा घटिका दिवसास येऊन बसून पुराणश्रवण करीत आहेत, भगवताच्या कथा नामे गाताहेत, त्याचे दर्शन घेऊन चार घटका पाहून चित्त बहुत शात जहालें तदनतर धीरसमीर जे या प्रति कालिंदीतीरी जाऊन सायंकाल संध्या करून भगवान् साबसदाशिव जो याचे एकाग्र मने करून ध्यान करून येता जाहलो. याप्रमाणे तीन चार दिवस क्रमिले. अनेक जन्माचे पुण्य की, असे वृंदावन दृष्टीस पडले, तेणेंकरून भगवंताच्या मूर्ती व भगवद्भक्त त्याचे दर्शनेकरून नेत्र पवित्र झाले पादेकरून चालत गेलो, तेणेकरून पायाचें सार्थक जाहाले हस्तेकरून नमस्कार करिता जाहालो, तेणेंकरून हस्त पवित्र झाले मुखेकरून नामस्मरण केले, तेणेकरून मुख पवित्र जाले कर्णेकरून भगवत्कथाश्रवण केले, तेणेकरून श्रोत्र पवित्रता पावले स्नानेकरून सर्व देह पवित्र झाला ज्या वृंदावनात बैरागी एकाग्र वृत्ति करून ध्यानस्थ होत्साते

---

* गोसाव्याचा मठ किंवा आखाडा.

कुंजाखाली जागा जागा बसले आहेत. कोणी पर्णेच भक्षून, कोणी जलप्राशन मात्र करून, कोणी दुग्धसेवन करून, कोणी सिद्धान्न आणून घालील तेंच खाऊन राहिले आहेत, अशाचे दर्शन घेऊन सत्समागमाचे माहात्म्य किंचित् आनंदाते पावलो त्यात एका वैराग्याने कृपा करून एक मंत्र भगवताचे नामाचा सांगितला, की याचा जप करीत जावा तो भगवतेंच सांगितला असा मानून, सर्वांस यथाशक्ति देणे देऊन, संतोषाते पावला पुढे दिल्लीस गेलो तेथे पृथ्वीपतीचे दर्शन श्रीमंताचे आज्ञेवरून घेतले त्यांणी बहुत कृपायुक्त भाषण करून, आशीर्वाद देऊन आपले जवळील वस्त्रे दिली, ती घेतली किंचित् संतोष जाहला की, भगवताचे कृपेचे अंतर्वर्ती ही कृपा आहे तदनंतर श्रीमंताचे लष्करात श्रीमंताजवळ आलो बसलो असता भूमिकंप जाहाला परंतु भगवताचे ध्यान चित्तात आणिता जालो दिल्लीतील चित्रे वगैरे विषय ज्यात पाप नाहीं असेही घेतले पाहिले पुढे उत्तरेकडील यवन § शत्रुत्वेकरून यमुना पैलतीरी पाऊण लक्ष सेनेसहवर्तमान येऊन उतरला परंतु यमुना भरपूर चालली, तेणेकरून उभयपक्षी स्तब्धताच जाहली पुढे कुंजपुरा श्रीमंतानी शौर्येकरून घेतला मीही युद्धात होतो ईश्वरे रक्षिले ता इतकियात यवन आलीकडे आला श्रीमंत सैन्यासहवर्तमान त्याचे समोर गेले, गांठ पडली तेव्हा मी तर लहान श्रीमंताचे बुद्धीस महान बुद्धि, परंतु भावी अर्थ तेणेकरून विपर्यास पडला आप्त होते, बळवंतराव मातुल व नाना पुरंधरे वगैरे, ते अनाप्त झाले जे अनाप्त शाहनवाजखानी, भवानीशंकर वगैरे ते आप्त झाले त्याचे वाक्याचे ठायीं विश्वास, तेणेकरून आपली रीत युद्धाची मोडून यवनाची रीत धरिली परस्परे युद्ध होत असे गोळे प्रत्यही शत्रूचे राहुटीवरून जात मातोश्री व स्त्री भयभीत होत की कसे होईल? ते ते समयी मातोश्रीस विनंती करीत गेलो, की मी विनंती करितो, एक ईश्वरी लक्ष असावे त्यात मातुल युद्धात होते ते पडले ते दिवशीच सर्व सैन्य नाशास पावावे, परंतु रात्र जाहली यामुळे राहिले त्या दोन महिन्यात मनुष्ये, पशु बहुत मेले अन्नाची महर्गता दुर्गंधी एकेच ठिकाणी, असे श्रम पाहिले पुढे मातुश्रीस श्रम फार जाहले होणार अवश्यक होतें, यदर्थी संदेह धरूंच नये, हा माझा निश्चय पुढें थोरले युद्ध उदयीक होणार—तो पूर्व दिवशी संकेत की, पराजय आपला जहाला तरी शत्रूचे हातीं श्रीमंताचें कुटुंब

---

पृथ्वीपति = बादशहा, जवानबख्त नावाचा शहाजादा भाऊनेंच तख्तावर बसविला होता.

§ अहमदशहा अबदाली पठाण.

व आपले, हानी लागू नये आपणच नाश करवावा आपण तर वाचत नाही असा सिद्धांत करून श्रीमंतांनी याचीही योजना केली

दुसरे दिवशी तयार होऊन प्रातःकालचे दोन घटिका दिवसास युद्धास गोळागोळीचा प्रारंभ जाहला श्रीमंत अति बुद्धिमान्, धैर्यवान, शूर, कृतकर्म, गर्व मात्र विशिष्ट, परतु तर्तूद फारच सैन्याची वगैरे कली शेवटी निशाणा-जवळील तर्तूद एकीकडे जाऊन शत्रूची मुख्यस्थानीच गाठ पडली मी श्रीमंतासन्निध ईशस्मरण किंचित् करून असें तो विश्वासराव यास गोळी लागली पडले ते हत्तीवर श्रीमंतानीं घालून उभेच राहिले तो पठाण पायउतारा आत येऊन मिसळले तोटातोटी होऊ लागली आणि डावे बाजूचे मातबर सरदार, चौघड्याचे धनी देखील पूर्वीच पळाले उजवे बाजूचेही होळकर शिंदे निघोन निशाण निघालें दोन तीन शत पायदळ होतें श्रीमंत दिसेनातसे जहाले तेव्हा ईश्वरे बुद्धि दिली माघारे फिरलो पूर्वी युद्धात बापूजी पंतीं¹ बोध केला माघारें फिरावें त्यास उत्तर केले की, अशा समयी श्रीमंतास सोडणे ठीक नाही परंतु पुढे याप्रमाणे जहालें लक्ष सैन्य त्यात मोठेमोठे सरदार असता एकही त्या समयी श्रीमंतास आप्त न जहाला बहुत अन्न भक्षिले, कृपा पुत्रवत् केली तितके, चागला काल होता तेव्हा केशास धक्का लागल्यास प्राण देऊ अशा प्रतिज्ञा परतु ईश्वर घटित विपरीत काळ, त्यात सोबती कोण होतो? सर्व सुखाचे सोबती भोजन आदरे करून करावें वस्त्रे, जवाहीर, जागिरा द्याव्या निदानी इतके असून ज्याचे देहाचे ठिकाण कोणास ठाऊक नाही सर्व वाताहात जहाले

मी सायकालचे दोन घटका दिवसास घोड्यावर पाणिपतात आलो त्या देशाचा मार्ग अगदी ठाऊक नाही तेथे परमेश्वर वाट दाखवायापुरते रामजीपंत* उभे होते सागू लागले, घोडे वस्त्रे टाकून द्यावी, त्यावरून सर्व टाकून शुद्ध लगोटी लावून बसलो रात्र जहाल्यावर चाललो तो एका कोसात तीन चार वेळा शरीरास हात लावून टोपीवाल्यानी झाडा घेतला दर खेपेस समागमेचे दहावीस तोडून टाकीत त्यात मी राहिलो हे सत्ता ईश्वराची परतु

¹ बापूजीपंत—हरिपंत फडके याचा सर्वांत वडील बंधु, रामाजी अनंत दाभोळकर, उपनाम काळे, सिंधांचा दिवाण.

बापूजीपत, रामाजीपत गहतच गेले असे जाता दाहा बारा कोश पश्चिमेकडे गेलो तो तेच शत्रु येऊन रामाजीपत, बापूजीपत वगैरे यास जखमी भारी केलें पडले मी एकटाच राहिलो तो गवतात गेलो ईश्वरें तृणे करून माझें रक्षण केले त्यास मोहनी घातली सर्वांस मारिल असता मी जवळ असता न मारिलें व गवत लाव असता जाऊ दिले पुढे ते गेल्यावर जाऊ लागलो तो पुढें दोन कोशावर दुसरे मागती दृष्टीस पडले तेव्हा मागता तृणात जाऊन बसलो ता जवळ येऊन काढू लागले ते समर्था ईश्वर त्यातीलच एका वृद्धाचे मनात सचार करिता जहाला, की कशास मारिता ? मग गेले तदनतर माझी शक्ति पाणिपतावर बहुत क्षीण, आमविकारादिक विकार युक्त, अन्न चालेना, असा मी त्याजवर दयासमुद्र साव सदाशिव जो याणे कृपा करून, शरीर अशक्त, ऊन पाहिलेच नाही, व पादचारी, अभ्यास नसता साळा सवा कोश अन्न उदका व्यतिरिक्त आला क्षुधा निसर प्रकर्षी लागल्या तेव्हा बोरीचा पाला सापडला तो खाऊन पाहिला तो तोडात जाईना तसाच सायकाळी एका ग्रामाबाहेर आलो, तो एका वैराग्याने पीठ आणून दिले त्याची भाकर खादली ती अमृत समान लागली नतर निद्रा केली

प्रात:काली गगासहस्रनाम म्हणत ईश्वर स्मरण करात चाललो तो एका गावामध्ये गेलो तेथे एक साहुकार होता त्यानें घरी नेले एक ब्राह्मण होता व यशवतराव चाबुकस्वाराकडील भटला, त्याजकडून स्वयपाक करवून भोजन केलें तो शत्रूचे स्वार गावात आले हे वर्तमान कळले तेव्हा साहुकार म्हणाला की आम्ही गाडी करून जयनगराकडे पावते करितो, गाडीत बसून चाललो तो पाहिले की हा फसवितो असे बुद्धीस येऊन गाडी टाकून पायउताराच होऊन चाललो बरोबर दोन तीन ब्राह्मण, दोन मराठी माणसे, याप्रमाणें दहा बारा कोश गेलो असे सात दिवस चाली चाललो नित्य भोजनाचें साहित्य ईश्वर देववी तेणेकरून समागमचे भटळी मुद्धा मसून रेवाडी पावेतो आलो तो लष्करचे पळे त्या वाटेनें गेले त्यास गावात यालोराव म्हणून चौरे भाऊ असत ते माझें नाव ऐकून पुसत कसे आहत ? चहरा कसा ? खुणाखाणा सर्व त्यानी पुसून घेतले मागाहून हे येतात हे जाणून मार्गावर नस्मा पत्तन बसत आम्ही आलो तो त्यानी रेवाडीबाहेर ओळखिले, पुसू लागले नाव न सागावे हा निश्चय, परतु तो असेच नाव लावू लागला त्याचे बोलण्यात वाकडा गाव नाही आम्हास साहित्य करून यावें, उपकार करावा हे पाहिले तेव्हा नाव सागितल्या

वर आपले घरास मंडळी सुद्धा नेऊन उत्तम प्रकारे भोजनाचे साहित्य करून दिले. भोजन केल्यावर वस्त्रे दिली तदनंतर रामजीदास जोशी मातबर रेवार्डीत असे, त्यास वर्तमान कळल्यावर त्याने आपले घरी नेऊन ठेविले, सात दिवस भोजनास व उत्तम वस्त्रे दिली. पुढें आमचे मानस दीग भरतपुरास जावयाचे परतु तो म्हणे सोबत चागली लावून गाडी करून देऊन पावते करीन त्यावर एक लग्न निघाले, त्याबरोबर गाडी करून देऊन बरोबर पेढे साहित्य करून दिले आम्ही निघालो तो वाटेत कृष्णभट वैद्य आले त्याणी सागितले की, स्त्री, विरोजी बारावरकर यार्णी संभाळून आणिली ती नारोपंत गोखले याचे घरी आहे. तेथे त्या गृहस्थाने साहित्य वस्त्रपात्राचें केले आम्ही तेथे गेल्यावर भोजन क्षिरीचे घातले तेव्हा आनंद झाला मग स्त्रीस एक गाडी दुसरी करून तेथून निघालो. तो दिगेस आलो तेथे पुरुषोत्तम महादेव पाणिपताहून आले होते, ते वानवळे याचे गुमास्त्याचे बिऱ्हाडास राहिले होते, त्यास कळताच त्यानी आपले बिऱ्हाडास नेले तेथे कुटुंबसुद्धा कमकसर महिनाभर होतो क्षुधा फार लागत असे त्यानी वस्त्रे वगैरे साहित्य भोजनाचे चागले केले तेथून मातुश्रीचा शोध फार केला परंतु घरचा खिजमतगार बरोबर होता, त्याने सागितले की घोड्यावरून पडून जखम लागून मेली हेच ठिकाण लागले

पुढे पालखी व घोडी घेऊन ढवळपुरावरून ग्वाल्हेरीस सारे लष्कर पळून पार्वतीबाई, नाना पुरंधरे, मल्हारजी होळकर, सारे होते तेथे आलो अंतःकरणापासून होते की, श्रीकाशीस जाऊन नेहमी वास करावा प्रपंचातील विषयमात्री दुःख हे पुरतें समजलें परंतु देहप्रारब्ध बलवत तेथे आलियावर सर्वांनी निषेध केला. एकदा देशी जावें. मातोश्रीचा विधि करावा वगैरे कित्येक प्रकार काशीत गेल्यावर कसे होईल पाणिपत जालें तेव्हा काशीहि कशी होते, असे चित्तात येऊन लष्कराबरोबर येऊं लागलो पाणिपताचे वर्तमान श्रीमत नानासाहेबानी ऐकून माझें स्मरण फार गुरुजी† जवळ केलें की, त्याचे शरीर अशक्त, कसा निभाव होईल? परतु ईश्वरकृपेने व त्याचे आशीर्वादेकरून महत्संकटातून पार पडलो पुढे श्रीमंत नानासाहेब याचे दर्शन बराणपुरावर जाले, पाहातो तो शरीर फार क्षीण जहाले आहे. मर्जी बेतऱ्हा जाली आहे, बहुताच्या अब्रू क्षणाक्षणा जातात परंतु मजवर सदयतेने लोभेकरून भाषण करून वर्तमान

उपनाम हिंगणे † महादाजी बल्लाळ करकरे गुरुजी.

पुसले सांगितले तीनचार दिवस बरोबर राहिलो श्रीमंत गोपिकाबाई व नारायणराव यास देवी आल्या करिता त्यासहवर्तमान नर्मदातीरी राहिली परस्परे उभयताचें चित्तही ठीक नाही हे कळले. कालवैपरित्येकरून न घडावयाचे तेही घडले.

तदनंतर या मर्जीत कसे होईल जाणून निरोप घेतला की, टोक्यास पुढे जातो जावे म्हणून आज्ञा दिली टोक्यास येऊन राहिलो तो श्रीमंतही मागाहून तेथेच आले पुन्हा दर्शन घेतले मर्जी बिकट असता एक शालिग्राम मागितला, तो बहुत कृपे करून आज्ञा झाली की, क्षेत्रातून पाहिजे तो घेणे सीतारामचंद्र मूर्ति घेतली एक दिवस प्रदोष तेथे पडला ते दिवशी श्रीमंत थोरले राव याचे श्राद्ध म्हणून मला भोजनास बोलाविले मी विनंति सांगून पाठविली की, प्रदोष आहे तथापि यावे म्हणून उत्तर जाहलें यावरून स्वारी देवास जाते समयी गुरुजीकडून विचारविले, तेव्हा आज्ञा जाली की, रावसाहेब याचें श्राद्ध आहे, याजकरिता जरूर यावे त्यावरून गेलो श्राद्धाचे ब्राह्मणभोजनें जाहलियावर खासा भोजनास बसले, एकीकडे श्रीमंत माधवराव (व) एकीकडे मला बसविले आणि दुसरे| स्त्रीकडून वाढविले तिला शिक्षा वाढावयाची दाखविली अर्थात् मातोश्रीकडून लेकरास वाटविले नंतर श्रीमंतास विनंती केली की, काही दिवस गंगातीरी राहून मन स्वस्थ करावे असे आहे त्यावरून आज्ञा जहाली की, काही दिवस राहावे श्रीमंत कूच करून पुण्यास गेले, तो शरीर क्षीणच होते शेवटील समय, लवकर यावे म्हणून पत्रे आलीं त्याचे अन्नाचे शरीर, समयीं जवळ असावे, याकरिता पुण्यास येऊ लागलो तो पारनेरा अलीकडे वर्तमान ऐकले की, कैलासवास केला श्रीमंत दादासाहेब याची पत्रे आली की, जरूर यावें पुढें पुण्यास आलो श्रीमंतास देवदेवेश्वर§ सनिध कैलासवास जाहला, हे ऐकून श्रम जहाले नंतर दादाही कृपायुक्त ममता केली पुढे श्रीमंत राजश्री माधवराव साहेब यास मातान्यास पेशवाईची वस्त्रें द्यावयाकरिता घेऊन गेले समागमें मलाच घेऊन गेले राजद्वारी वस्त्रे घ्यावयास समागमे येणे म्हणून बहुत आग्रह केला विनंती केली की, आम्हास गरज काय ?

---

बाजीराव बल्लाळ पेशवे. | हा नारोबा नाईक बागरे पैठणकर याची कन्या लग्न श १६८२ मध्ये मार्गशीर्षांत झालें नाव राधाबाई ठेविलें

§ पर्वतावरील महादेव

आमचे खावद आपण म्हणोन गेलो नाही. त्यावर श्रीमंतां राज आज्ञा घेऊन पुण्यास यावयास निघाले समागमेच होतो नंतर श्रीमंत नीरा उतरोन पलीकडे गेले आम्ही उद्या उतरोन जाऊं म्हणोन शिरोळ गावात राहिलो नदीस पूर आला याकरिता नावेत बसलो मध्ये धारेत नाव आली ती प्रवाही पडली नावाड्यानी सागितले की आमचा उपाय नाहीं तेव्हा पुढे खडक जवळ आला, फुटली, म्हणजे शेवटलाच पक्ष तेव्हा ईश्वरस्मरण केले तो दोन मनुष्यानीं उड्या टाकून नाव ओढून काढली हे रक्षण क्षीराब्धिशयन महाविष्णु याणे केले पुढें पुण्यास आलो, तो श्रीमतानी कृपा करून यासमयी कार्यात मन घालावे हे आज्ञा केली

---

## ४१

**पु. द. भा. १ ले. ४१८.]** [ २ एप्रिल १७६१

# लटके मनसबे न करणें

**[ पेशवा नानासाहेब उत्तर हिंदुस्थानची व्यवस्था लावून दक्षिणेकडे निघाला तेव्हांचें त्याचें त्रिंबक सदाशिव पुरंदरे यास पत्र. मल्हारराव होळकरानें पानपतावर कुचराई केली असा पेशव्याचा समज होता. त्यासंबंधीं वाटाघाटी चालून अखेरीस उत्तरेची सर्व जबाबदारी मल्हाररावावरच सोपावी असें पेशव्यानें ठरविले. ]**

**श्री**

चिरंजीव नाना यासी आसीर्वाद उपरी तुम्ही लिहिली मसलत उत्तम परंतु या देशी हवा अतिशय सर्द गोपाळरायास§ सर्व ठाऊक आहे यास्तव उजेनीहून कूच केले इंदुरावरून ओंकारेश्वरास जातो गोपालराव चैत्रात जितके काम होईल तितके करून अक्षत्रितीयेस येतील दिल्लीहून जयनगराहून बातमी आली की, अबदाली दोन मजली माघारा गेला गुंता नाही सुज्याउदौला ती मजली आपले देशाकडे गेला आता मी राहणे किमर्थ? मल्हारबा, विठ्ठलपंत, नारो शंकर, गणेश संभाजी, मजकडील तीन च्यार हजार फौज मिलोन छावणीस

§ गोपाळराव – गोपाळ गोविंद पटवर्धन.

राहातील मल्हारबा इंदुरास राहातील व राहावे सर्व हिंदुस्थानचा यखतियार त्यावर आहे शफतपूर्वक ऐसी दोन पत्रे पाठविली पावली न पावली हे न कळे तुम्ही लटके मनसबे न करणे पत्रदर्शनी लाब मजली करून ओंकारेश्वरास येणे आठ दिवस तुमची वाट उजेनीस पाहिली या उपर पत्रदर्शनी अनमान कराल तर शफत असे छ २५ साबान हे आसीर्वाद

## ४२

पे. द. भा. २ ले. १४८ ] [ २५ फेब्रु १७६१

## कालचक्रानुसार विपरीतार्थ

**[ सदाशिवराव भाऊचा प्रेतसंस्कार यथासांग केल्याबद्दलचा मजकूर मराठ्यांचा सुजाउद्दौला याजवळचा वकील काशीराज शिवदेव याने पेशव्यास खालील पत्रांत लिहून कळविला आहे यावरून पुढे सदाशिवराव भाऊचा तोतया खोटा आहे ही पेशव्याची संपूर्ण खात्री होती. ]**

श्रीसाब शिव प्रा

श्रीमंत रा पंत प्रधान स्वामीचे सेवेसी —

पो। काशीराज शिवदेव दि।। नबाब शुजाउद्दौला कृतानेक सा। नमस्कार विज्ञापना यैसीजे येथील कुशल जाणून स्वामीही निजानदवैभवलेखनाम आज्ञा करीत असले पाहिजे विशेष. येथील प्रसंग आपले सैन्याचा व गिलज्याचा मुकाबिला होता कालचक्रानुसार विपरीतार्थ निदर्शनास आला तो परस्परे सेवेसी विनंती जाला असेल. येजमानाचा आपला स्नेह अविछिन आक्रित्रीम आहे तोच आहे अगतिकत्वे येणें जाले यथाशक्य सोरस्यास मनोदये होता परंतु भगवत सत्ता यैसीच होती, त्यास उपाये काये ? जुंज मोडलिया महायिवनेछा विपरीत भावे होती त्यास आम्ही ब्राह्मण व आपले सेवक असता अर्थ व्हावा हें अनुचित जाणून येजमानास बोध करून महतायासे श्रीमंत भाऊ सो व श्रीमंत रावसो-बाची शवे रणांगणीहून आणून ब्राह्मण मंडळीचे महित चंदनादि उपचारें संस्कार केला हेहि त्याचेच पुण्य महायें जालें की यैसा योग जाला असता

संस्कार येथाविधि जाला जे शर्तमर्दीची ते केली का जसे आपले आश होते येजमानास या प्रसंगामुळे बहुत खेदावह जाले

स्वामीराजांसहि परम दुःखावह होईल परंतु भगवत इच्छेस उपाये काये? स्वामी सर्वज्ञ आहेत विज्ञापना करावी यैसा अर्थ नाहीं सेवकास दासवर्गात जाणून सदैव आज्ञापत्री सनाथ करीत जावें बहुत काये लिहिणे, कृपा निरतर असो दीजे हे विज्ञापना माघ कृष्ण १२ मु॥ दिल्ली

---

## ४३

**खरे ऐ. ले. सं. भा. १ ले. ९९]** [१७ फेब्रु १७६३

# चुलते-पुतण्यांची एकवाक्यता

**[माधवराव पेशव्यानें मातुश्रीस लिहिलेलें हे सुंदर पत्र मराठ्यांच्या इतिहासांत विशेष महत्त्वाचें समजलें जातें ]**

तीर्थरूप मातुश्रीबाई, वडिलाचे सेवेशी,

कारभारी याचे पेचामुळे आमचे दौलतेच्या तणावा तुटत चालल्या पहिल्यापासून राखले असते तर सर्वही आपापला कारभार करून लगामी राहते, तें न झाल्यामुळे सर्व मुलूख बुडाला. पत-पातेज उडाली लोक फितूर झाले धन्याचे वजन राहिले नाही शत्रु बलवत्तर झाले तथापि पैसा असता तरी सर्वही गोष्टी, इतकेही पेच साभाळून, नीट होत्या पैसा नाहीं फौज कशाने ठेवावी? फौज नाही, दौलत कशी राहाणार? असे, बारीक बारीक पाहता, सारे अवघडच आहे प्रस्तुत दादासाहेब व आम्ही एक झालो, हीच गोष्ट एका करोडीची जाहली. त्याची आमची एकवाक्यता जाहली. ममताही परस्परे पहिल्यापेक्षा अधिकोत्तर मिळाली कारभारीही आमचे लगामी उत्तम प्रकारे लागले आमची दौलत पूर्वीप्रमाणे करावी, हेच मानस अंतर्यामापासून त्याचे आहे या उपर त्याचा दुसरा संकल्प नाही जे करणे ते आपले व आमचे विचारें करावे दौलतीस ज्या गोष्टीने कल्याण तीच गोष्ट साऱ्यानी करावी हीच बुद्धि आहे, व प्रस्तुत याप्रमाणेच चालत आहे. आता गोष्टी जाहल्या आहेत, याच गोष्टी दृष्टीस असाव्या. येणे करून पार लागेल तो लागेल, नासले, त्यास दुसरे झाले तरी अगदीच

नासेल, यास्तव झाले ते उत्तम आहे एक विचार असावा तो आहेच. परिणाम लावणार परमेश्वर व वडिलाचे पुण्य समर्थ आहे बहुत काय लिहू, हे विज्ञापना

---

४४

**खरे पे. ले. से. भा २ ले ३४७]** [१४ ऑगस्ट १७६३

**पौ छ १६ सफर**

# आम्हापेक्षां अधिक झाले

**[खालील पत्रांत रघुनाथरावानें माधवराव पेशव्याची योग्यता निःसंशय कबूल करून ती आपल्या भावजयीस कळविली आहे.]**

ती० मातुश्री बाई वडिलांचे सेवेसी रघुनाथाचे नमस्कार विनंती. चिरंजीव रायांनी यंदा मेहनतीत व शिपाईगिरीत कमी केली नाहीं आम्हापेक्षा अधिक जाहले. इतके दिवस त्यानीं लढाई देखिली नव्हती (ही) पहिली लढाई पाहिली ह्यात सर्व प्रकारे तर्तूद अधिक केली त्याचा पुढे कर्तपणाचा भरंवसा आम्हास आला साप्रत कारभार चिरंजीवच करितात आमचे मर्जीप्रमाणें वर्ततात तिलमात्र वाकडे चालतो नाहीत आम्हीही यथाज्ञानें सुचते तें त्यास सागता तेच कारभार करितात माझें शरीर बहुत अशक्त झालें, मेहनतीस कामाचें नाही निजामलीचा मनसबा शेवटास गेल्यावरी कोठे तीर्थी बसून काही ईश्वरभजन करावें इतकेच मानस आहे परमेश्वर इच्छा पूर्ण करणारा समर्थ आहे आता निजामअलीस मारणे सहज आहे, परंतु लोकास ऐवज पावला नाही, यामुळें लोक मन घालीत नाहींत तथापि जोर करून ईश्वरस्मरण करून काम हरकमे शेवटास नेतच आहो

**[यानंतर एक महिन्यानें दादाचा विचार फिरला तो असा—पहा मजरचा ले. ३६७.]**

'दादाचें मानस नऊ लाखाची जहागीर व चार किल्ले घेऊन मातुश्रीच्या विद्यमाने बेकिलाक करून§ निरोप घेऊन स्नानसंध्या करावयास त्र्यंबकास जावें. अग्निहोत्र घ्यावे हा मनोदय आहे'

---

§ संशय टाकून.

४५

राज० खं. १३ ले. ८४ ] [ १९ जून १७६५

# दौलतीची वाटणी अनिष्ट

**[ खालील खुबीदार पत्र माधवराव पेशव्यानें रघुनाथरावाचा कारभारी चिंतो विठ्ठल रायरीकर यास लिहिलें. त्यांत चुलते पुतण्यांच्या भांडणाचें बीज व दादाचा क्षणभंगुर स्वभाव चांगला व्यक्त होतो. ]**

ही दौलत मोठी. या दौलतेस सर्व लहान मोठ्यानी अनुकूल असून जेणेकरून दौलत नीट होय तेच सर्वांनी करावे. ते एकीकडे राहून दौलत दोहो जागा करावी हेंच तीर्थस्वरूपाचें मानस त्यास आम्हास काही करणे नाही कारण की, ही दौलत पहिल्यापासून एकानीच करावी, वरकडाचा भार करणारावर असावा. याप्रमाणे चालत आले असता, आता वडिलाचें मानस की, आम्हास गुजराथ द्यावी, आणि सर्व किल्ल्याचा बंदोबस्त आम्हीच करूं म्हणतात, त्यास आम्हास काही करणें नाही का की, अशाने ही दौलत चालणार नाहीं व दोहों जागा दौलतीचे वाटे केल्यानें लौकिकही वाईट, यास्तव सर्व वडिलानीच करावे. आम्ही स्वस्थ भलते जागा राहूं आपल्या आपल्यात भाडून दौलत बुडविली हा लौकिक कशास पाहिजे? सर्व त्यानींच करावे हे फार चागले आम्ही स्वस्थ राहूं वडिलानी नीट केल्यावर आम्हास सागतील तेव्हा आम्ही जवळच आहो हेच प्रस्तुत काळी बरे तुम्हास लिहावयाचें कारण इतकेच की, सर्व लोक म्हणतात, ही दौलत थोर, तीर्थस्वरूप दादासाहेब चिंतोबाचे हाती, तेव्हा चितोबानी वडिलास समजून सागावें, आणि या गोष्टीचा बंदोबस्त पाडावा हे एकीकडेच राहून नव्या गोष्टी नित्य निघतात हें काय? तेव्हा या गोष्टीचा शब्द तुम्हावर लोक आणितात तुम्ही तर वडिलास आपल्या तर्फेने सागतच असाल परंतु वडिलाचा इतबार तुम्हावर, तेव्हा शब्द तुम्हावर आणितात तुम्ही तर नीट करता, परंतु लौकिक बाहेर कसा आहे हा तिन्हाइतास पुसावा ही चिठ्ठी वाचून फाडून टाकणे. दुसऱ्यास एकंदर कळूं न देणें.

दुसऱ्यास कळवाल तर शपथ असे हेच बोलणे रुबरु बोलावेसे होते; परतु वर्तमान ऐकिले की, तुम्हास बरे वाटत नाही, यास्तव चिठ्ठी लिहिली असे '
मोर्तब सुद

---

४६

चं. द. ले. १०८ ] [ ४ जून १७६६

## वडिलांप्रमाणें लौकिक करा

**[ ता २० मे १७६६ रोजीं मल्हारराव होळकर गोहदनजीक आलमपूर येथें मरण पावला. दौलतीचा वारस त्याचा नातू अहल्याबाईचा पुत्र मालेराव होळकर यास खालील सान्त्वन-पत्र अहिल्याबाईने लिहिलेलें आहे. ]**

श्री

पो छ ९ मोहरम मुा चरोली प्रात गोहद

चिरंजीव राजश्री मालबा यासि प्रती अहिल्याबाई होल्कर अगीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत जाणे तुमचे पत्र येऊन वर्तमान कळो येत नाही तेणे करून चित उद्विग्न आहे तर ऐसे न करावें सदैव पत्र पाठऊन सविस्तरे लिहित जाणे आम्ही तुम्हास दोन तीन पत्रे पाठविली आहेत त्या प्रा चिताचे समाधान करावे अता शोक करावयाचा प्रकार नाही सरदारीचा विचार दौलत चालली पाहिजे, यास्तव विवेक करून कामकाजात चित घालून आव घालावा ज्या प्रा तीर्थस्वरूप कैलासवासी सरदारी चालवीत आले त्याच प्रा तुम्ही पाया घालून त्याज प्रों कामकाज चालऊन वडिलाप्रों लौकिक होय तेच तुम्ही कराल अता कोता अंदेशा दूर करून उमदी नजर धरून वडिलाची कीर्ति आहे त्याजपेक्षा तुम्ही अधिक सपादन कराल यातच तुमचा लौकिक आहे राजश्री गंगाधरपंत तात्याच्या * मर्जीनरूप वर्तत जाणे

रा छ २५ माहे जिल्हेज बहुत काये लिहिणे हा आसीर्वाद.

---

* चद्रचूड, होळकराचा कारभारी.

४७

पे. द. भा. ३९ ले. ८१ ] [ १७ जाने १७६७

# सेवकांनीं विनंतीमात्र लिहावी

**[ या पत्राचा लेखक त्रिंबक विश्वनाथ पेठे हा पेशवाईंत सेनानायक व चतुर मुत्सद्दी म्हणून प्रसिद्ध होता. याची भाषाशैली स्पष्ट व मुद्देसूद असून राजकारणी कारभारांत तो चतुर म्हणून गणला जात असे. त्यानें खालील पत्र रघुनाथरावास लिहिलें आहे. ]**

पौा छ १९ शाबान श्रीशंकर

श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामीचे शेवेसी

विनंती सेवक त्रिंबकराव विस्वनाथ कृतानेक साष्टाग नमस्कार विनंती येथील कुशल ता छ १६ साबान मु ।। झासी स्वामीचे कृपेकरून वर्तमान यथास्थित असे विशेष शरीरी अद्यापिहि अनारोग्य आहे परंतु आपले कृपेकरून आरोग्यहि होऊन योजिले कार्याची कार्यसिद्धि स्वमीचेच पुण्यप्रतापे होईल पौष कृष्ण द्वितीयेस झाशीहून स्वार होऊन काल्पीस गेलो सक्रमणप्रयुक्त तिलशर्करा थैली सेवेसी पाठविली असे कृपा करून स्वीकारून पावलियाचे उतर पाठवावयास आज्ञा करावी. कालपीस गेल्यानतर तिकडील नवल विशेष सरकारउपयोगी मजकुर असल्यास सेवेसी पत्र लिहून पाठवीन त्या उपर दूर लाबणे तर लाबावे मनसब्यास कळ बसल्यास फिरोन तसा घाट उतरीन म्हटल्यास उतरत नाही सेवक लोकी विनंती मात्र ल्याहावी, यास्तव आमचे पत्राची प्रतीक्षा असावी. सेवसी श्रुत होय हे विज्ञापना.

— -

४८

राज० खं १० ले. १५७] [१४ मार्च १७७५

## इंग्रजांचे हातीं मोठा किमया

**[नारायणरावाचे वधानंतर रघुनाथराव दादा इंग्रजांचे आश्रयास सुरतेस गेला. त्याचे पाठीवर हरिपंत फडके असतां, दादास हाताशीं घेऊन इंग्रजांनीं पेशव्यांचे राज्य घेण्याच्या काय खटपटी चालविल्या त्या पेशव्यांच्या एका सरदारानें पुण्यास लिहून कळविल्या आहेत.]**

श्री

श्रीमंत राजश्री पतप्रधान स्वामीचे सेवेसी–विनति सेवक बाजी गंगाधर मु॥ बेलापुर चरणावर मस्तक ठेऊन सा नमस्कार विज्ञापना तागाईत छ १० माहे मोहरम पावेतो स्वामीचे कृपावलोकने करून सेवकाचे व तालुके मजकुराचे वर्तमान यथास्थित असे विशेष काल रविवारी सध्याकाळी राजश्री रणछोड शेणवी वकील सरकाराचे मुबईस होते ते येथे आले कारण श्रीमत दादासाहेबी सुरतेहून सनद मुंबईस पाठविली की, लक्षुमण गोपाळ यास वकिली सागितली आहे, त्याजपासोन कामकाज घ्यावे आणि रणछोड शेणवी यास सुरतेस रवाना करणे हे वर्तमान मारनिल्हेचे दुष्ट मेम्त्र मोस्टिन यानीं सागितले, त्याजवरोन हे तेथून चद्रगमनी होऊन होडीस पाच रुा देऊ करोन आले होडीवाले याने साष्टीचे खाडीत अलीकडे मौजे वसी ताा मजकूर याचें नस्तावर* चिखलात उतरोन होडी निघोन गेली तेथे चौकी सरकारची आहे त्याणी बरावर शिपाई देऊन येथे रवाना केले ते प्रहर रात्रीस आवशीचे पावले त्याणी मजकूर सागितला की, श्रीमत दादासाहेब सुरतेस आहेत इग्रजानें जागा राहावयास माहामुदी बागात दिल्हा आहे श्रीमंत अमृतरावजी बराबर आहेत नाटकशाळा आठ जणी व पंचविस च्याळीस पावेतो खिजमतगार वगैरे आहेत इग्रजाने आपले लोक जवळ ठेविले आहेत सर्व साहित्य त्याजकडूनच होत आहे मुबईहून राजश्री सदाशिवपंत सौनी व नारोपंत गेले ते श्रीमंताजवळ आहेत. कारभार प्रस्तुत नारोपत करतात सुरतेचे जफ्तीस‡ सरकारचे राऊन हजार बाराशें होते

---

* नस्त भरतीचें पाणी पोचण्याची उंच जागा ‡ सरक्षणास.

त्यांस दादासाहेबानीं दोन वेळा सनदा सादर केले व निदानीं सांगोन पाठविले कीं, उठोन जाणें, नाहीं तर खासा स्वारी होईल !

त्याजवरोन बदीचे लोक पाच कोस माघारे सरले. इंग्रजाची उमेद तीन हजार गाडदी वगैरे लढाईचा सरंजाम घेउन रा गोविंदराव गायकवाड व खंडेराव गो यांजकडोन पो बडोदें आधी सर करोन गोविंदरायास द्यावे, नंतर अमदाबाद घ्यावी भडोजेस गायकवाडाची तक्षीम निम्मे आहे ती इंग्रजास बक्षीस द्यावी आणि मोबदला गाइकवाडास बडोदे पो ऐवज सरकारतर्फेचा द्यावा राजश्री हरिपंत तात्याचे फौजेबरोबर लढाई घेऊन श्रीमतास देशीं पुणेयास आणावें इतके जालियावर इंग्रजास सुरतेची चौथाई बक्षीस द्यावी सुरतअठाविशी, वसई, बेलापूर देखील द्यावे याज प्रा करारमदार उभयपक्षीं होऊन शिक्के देखील झाले इंग्रजाने बदर किनाऱ्याचे तालुकदारास व धुळपास दादासाहेबाच्या सनदा § आणावयाविशी मुजरत† फतेमारी गेली आहे सनदा आल्या म्हणजे ज्याच्या नावच्या येतील तिकडे पाठवाव्या कोण सनद मानितो, कोण मानीत नाही, हे पहावे प्रस्तुत दादासाहेब म्हणजे मोठा किमया इंग्रजाचे हाती सापडला आहे दुसरे दैवत नाही. ऐसा प्रकार मुंबईस जाला आहे सुर्तेहून फतेमारी मुंबईस दोहो रोजा येत्ये दादासाहेबाचें पत्र मुंबईस जनरलास ॱ आलें कीं पुणेकर सावकार मुछदी याचा ऐवज मुंबईस आहे तो जप्त करणे, जाऊं न देणें यापमाणें पत्र आले आहे

इंग्रजास प्रस्तुत स्वर्ग ठेगणा जाला आहे वरकड मुबईत आज पाचशें माणूस व साष्टी टापूंत आठ नवशे, उरणास दीडशेंपर्यंत आहे आणि हिकडून कोणी त्याजवर जात नाही, याजमुळे फार टीका करितात असा प्रसंग. मुबईस लोकाची भरती नाही, ऐसे घडलें नाही तिजोरी जामदारखान्यामध्यें आज पंचवीस हजार रुा पाहिजेत, तरी नाहीत धुळपाचे आरमाराची मोठी सलावत इंग्रेजावर आहे, परतु तोही आरमारसुद्धा येत नाही दबोन राहिला आहे. याजमुळें इग्रज फारच हावभरित‡ जाला आहे बंगाली व चिनाई व विलायती व बसराई मिळोन दाहा अकरा तराडी तालचिरीस नागखाडेयास आहेत. वर माल बहुत आहे. हलावें यासाठी खोटी आहे. मुंबईस गुराबा व रेवा दोन

---

§ लेखी हुकूम. † मुद्दाम एवढ्याचसाठी. ॱ गव्हर्नरास ‡ उमेद वाटणारा, जोरदार.

तरंडी मुबईपैकी आहेत परंतु याचा भरवसा धरीत नाही. धुळपाची सलाबत मोठी गालीब+ आहे. तिसरे तराडे विलायती येणार आहे तें आलेयाजवर मग यावे, ऐसा करार जाला आहे. प्रस्तुत धुळप हिकडे नाही, त्या अन्वयें तिकडेच त्या तराडेयाजवर सख्ती करून गळी पडला तर मोठे काम होईल इग्रजास तितकी दहशत आहे याजकरिता सरकारातोन धुळपाकडे कोणी शाहाणा माणूस व पत्रें जावोन, त्यास बक्षिस देऊं करोन सुवर्णदुर्ग वगैरे तालुके याचे आरमार एकत्र करून, त्या तराडेयाजवर जावे अथवा मुंबईस यावें, लूट माफ करावी, शहर लुटोन फन्ना करवावें. या प्रो जालेयास इंग्रजाचा गर्व परिहार होईल इग्रेज म्हणतो कीं, मर्वाचा ऐवज मुबईस आहे, यामुळे आम्हावर सकती कोणी करणार नाहीत या प्रो बोलतात म्हणोन रणछोड शेणवी सागतात याजवरोन विंनति लिा आहे. मारनिल्हेचे मानस स्वामीचे भेटीस यावयाचे बहुत आहे आज्ञा होईल त्याप्रा वर्तणूक करितील कित्तेक मजकूर स्वमुखे विनति करणार आहेत सरकार उपयोगी आहेत आज्ञेप्रमाणे वर्ततील

श्रीमंतास मुंबईस आणावे हें मानस इग्रजाचे नाही दुसरा मजकूर, सावकारी वर्तमान रा गोविंदराव गो व खडेराव गो दोन्ही राजश्री हरिपत तात्याकडे रुजू झाले हे असल्यास इग्रजाच्यानें काही होत नाही फजित पडतो साष्टी तालुका घेतला पुढेंही मनसबा कित्तेक करितो हा विचार मेस्त्र मोस्टिन याचे व दुसरे दोन कोशलदार याचे विचारास येत नाही, परतु सरकार काम आणि साष्टीचे यश आलें याजमुळे उपाय नाहीं, ऐसे म्हणतात सदरहु विनति मा-निल्हेचे जबानीवरून सेवेसी लि आहे. रणछोड शेणवी यास हुजूर आणावयाचें असल्यास, राजश्री विसाजी कृष्ण याम आज्ञापत्र असावें म्हणजे घोडे व तट्टू देऊन रवाना करितील सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना

---

+ जबर.

# ४९

**ऐ. टि. भा. १ ले. ३९ ]** [ ५ नोव्हे १७७७

## इंग्लंडचे राजास पेशव्याचें पत्र

**[ नारायणरावाच्या मृत्यूनंतर इंग्रज मराठ्यांचे युद्ध सुरू झालें त्यांत आपली नुकसानी कशी झाली हा प्रकार नाना फडणिसानें पेशवा सवाई माधवराव याचे नांवें इंग्लंडचे राजास पत्र लिहून व्यक्त केला आहे. तत्कालीन भाषेचा व इंग्रजी राजकारणाचा उत्कृष्ट मासला या पत्रावरून पहावयास मिळतो ]**

श्री

बंदर बंबई पूर्वी कोठी लहान होती, आणि तमाम या प्रातात वलदेज व परतकेज ( पोर्तुगीज ) याचा उदीम फार होता तेव्हा बंबईकर गवरनर यानी आम्हाशी पैगाम लावून तीर्थरूप बाजीराव याचे कारकीर्दीस कौल घेऊन, एखलासाचे करार करून, नेकराह चाल दाखवून आमच्या राज्याचा आसरा पुरता केला. त्यावरून आम्हीं वलदेजाचा उदीम या प्रातात फार होता, तो बंद करून इग्रेजाचा उदीम जारी केला, व परतकेज ( पोर्तुगीज ) याजला तवी पोहचावून सरकारच्या मुलकास लगतो बदरे सरकारात घेतली त्यावरी जे गवरनर व कौसल बंबईस येत गेले, ते आम्हासी रुजू राहून स्नेहच राखीत गेले तीन करकीर्दीचे तीन दफे७ एखलासाचे करारनामे तरफेन लिहून दिधले मध्यें मध्यें कितेक लोकासी व इग्रजासी बिघाड घेऊन बंदरावरी लढाया जाल्या त्यानी आम्हास कुमक मागितली परतु इग्रजाचे दुशमन जाणून कुमक न दिल्ही नफे होते ते कबूल न केले ऐसा एखलास फार दिवस चालला अलीकडे चार सालें जाली, किबलेगाह रघुनाथराव यानी आमचे पदर † किबलेगाह नारायणराव यासी दगा केला. याजमुळें घरात फितुर पडला आमच्या फौजा काही हिंदुस्थानात, काही कर्नाटक प्रातीं, काही रघुनाथराव याच्या ताकुबावरी, वजीर अमीरसुद्धा गेल्या होत्या ते समयी काबू पाहून, गवरनर बंबई यानी सरंजाम जमा करून, बवजूद§ टॉमस मोष्टीन त्याचा वकील पुण्यात असता

* वेळा वशज † पदर-इग्रजी father या शब्दाचा तुर्कांचा उच्चार ‡ पाठलाग.
§ शिवाय, आणखी.

एकाएकी जाऊन, गवरनर मजकूर यानी आमचा आब व आनश$ पाहून, वतनाची जागा साष्टीस मोर्चे लाविले. वीस पंचवीस दिवस किल्लेवाल्यानी मकान राखिले इंग्रजाचा कौल करार दुरुस्त याखातर साष्टीस कुमक न पोहोचली. याजमुळे साष्टी व तान जंजिरे धाकटे येशवंतगड वगैरे घेतले त्याउपरी रघुनाथराव यानी गव्हरनर कौंसल बंबई यासी साख्त+ करून त्यास आपल्या मकानास बोलावून त्याची कुमक करून आमचे फौजेशी दोन वर्षे लढाई सुरू केली. एक दोन लढाया लहानशा जाल्या. त्या तुम्ही ऐकिल्याच असतील त्यानंतर गव्हरनर कौसल कलकत्ते यानी दूर आदेशीवरी नजर ठेवून, आम्हाकडे सलहाची पत्रें पाठवून, मागून कर्नेल जॉन इपटेन यासी मुखत्यारनामा देऊन आम्हाकडे पाठविले आम्ही पुरातन स्नेह जाणून स्नेहाचे जाबसाल केले की, तुम्हीं साष्टी वगैरे जंजिरे सोडून देणे, रघुनाथराव याची कुमक न करणे; बसबब§ रघुनाथराव याची कुमक करून पन्नास हजार फौजेचा खर्च तीन करोड रुपये आम्हावरी पाडिला तो देणे; व गुजराथ मुल्ख तमाम इंग्रेजानी लुटून मुबलक पैका घेतला तो, व साष्टीत माल मालियत, गल्ला, तोफा, दारुगोळा, सरकारचा व रयतेचा माल मालियत, गल्ला वगैरे देणे म्हणजे तुमचा आमचा सलाह होइल त्यास कर्नेल इपटेन यानी साष्टी वगैरे जंजिरेयाचा जाबसाल कौसल कलकत्ते याजवरी ठेविला आम्हीही ते जागा सल्ल्याच्या हालात एकाक दग्याने घेतले जंजिरे देवितील, म्हणून त्याजवरीच मुनसफी ठेविली त्यास त्यानी बबईवाले याची पास करून† साष्टी वगैरे जंजिरे तसेच ठेविले उफराटे तीन लक्ष रुपयाचा मुल्क व बारा लक्ष रुपये खर्च, रघुनाथराव याची कुमक करून इंग्रेज जुंजले, याजबद्दल आम्हांसच मागूं लागले

आम्ही इंग्रजांचा स्नेह बहुत दिवसाचा आमची स्थळे आम्हांस देवितीलच; व कलकत्तेकर यानी मातबर माणूस पाठविला यावर नजर देऊन, करोडोचे खर्च व खराबी मुलकाची व साष्टी वगैरे जंजिरे याची ठाणी व तेथिल मालियत एकीकडे ठेवून, जे कौंसल कलकत्ते यानी व कर्नेल इपटेन यानी सांगितलें; याजवरून एकसालावर नजर देऊन कौसल कमन‡ कलकत्ते याचे मारफतीनें जमियेकौम× इंग्रज व पादशाहा या कंपनी इंग्रेज यासी सलाह करून, परस्परें करारनामे ठरले करारनाम्याचे तारिखेपासून तीन महिने वीस रोज, इंग्रेज

$ मित्रत्व, स्नेह. + दोस्ती. § विनाकारण. † कड घेऊन. ‡ राहणारे.
× येथील हिंदुस्थानातील.

रघुनाथराव याजबरोबर होते. त्यानी करारनाम्यात फिलफौर१ रघुनाथराव याजपासून करून घ्यावें ऐसें असता, फिरोन चार महिने फौजेचा खर्च आम्हावरी पाडिला मुरतेत रघुनाथराव याच्या फौजेसह आसरा दिल्हा आखेर आमची फौज भारी होती, रघुनाथराव याची फौज लाइलाज होऊन कौल घेऊन निघाली रघुनाथराव यास मुरतेजवळ ठेविलें, दोस्ती जाली, म्हणून सरकारच्या फौजा हुजर आल्या त्यानतर रघुनाथराव याही बाहेर दोन महिनें काढिले. फिरोन जाहाज पाठवून नेऊन त्यास बंबईत आसरा दिल्हा दुसरे एक फिसादी† कोंकण मुलकात पैदा होऊन, काही लोक जमा करून, तमाम मुलक काकणात ताराज करून, सरकारचे कितेक किल्ले त्याने घेतले तेव्हा सरकारची फौज त्याजवर रवाना केली त्यानी फिसादीयासी शिकस्त दिली. त्याची जमियत तमाम गारत केली फिसादी साहा हजार लोकानिशी पळोन गेला. त्यामागें सरकारची फौज लागली असता खुद्द फिसादीयासी सरकारचे सरदार राघोजी आगरे यानी धरून हुजर पाठविले हजार लोक त्याचे, सरकारची मालियत, हत्तीघोडे घेऊन माष्टीपासी गेले, त्यास माष्टीवाले यानी आसरा दिल्हा

आम्ही गव्हरनर मुबई यासी खतें लिहून पाठविली की, हल्ली करारनामा जाला त्यास तुम्ही रघुनाथराव यासी किस्त्या२ पाठवून बबईस घेऊन जाऊन आसरा दिला, व फिसादीच्या लोकानी सरकारचा लाखोचा खिसारा* केला असता व सरकारची मालियत त्याजजवळ असता तुम्ही आसरा दिल्हा, यात रास्तकौली‡ इग्रेजाची कोठून राहिली? त्याचा दरजबाब गव्हरनर मजकूर यानी आम्हास साफच लिहून पाठविला, त्याची नक्कल पाठविली असे अजोन रघुनाथराव व फिसादीचे लोक बबईत आहेत याजवरून आमचे मातबर सरदार इग्रजाच्या सल्ल्यास राखून ठेवितात दुनियेंत रास्तगोई× परमेश्वरानें किमिया दिली आहे जो वचनास अतर करितो, त्यास या लोकीं परलोकीं जागा नाही ईश्वरकृपेनें या राज्याची दुशमनी दर्यावश परतकेज (पोर्तुगीज) वगैरे यानी केली, ते खराबच जाले खुशकीतील बादशाहा अवरगजेब आलमगीर वगैरेनींही दुशमनी केली, त्याची सजा पावले अखेर कितेक मतलब कबूल करून सल्ला केली आम्हासी जो साहेब मुल्क असेल तो दुशमनी करू शकत

१ लागोलाग † बडखोर, नातया २ नका * खराबा ‡ सत्य, प्रामाणिकपण।
× सत्यवचन

नाहीं. कारण कीं, आमच्या फौजेपुढे त्याच्याने मुलूक रक्षण होणे नाही. गव्हरनर कौसल कलकत्ते यानी आम्हास लिहिले की इंग्रेज कोणाचा मुल्क मागत नाहीत अखेर नव लक्षांचा मुलूख चार जजिरे साष्टी वगैरे बंबईवाले याच्या हाताखाली ठेविलेच आहेत! व सरकारचे बागी† यासीं आमचे हाती द्यावे, कोणीही सबबें कुमक न करावी, म्हणून पेशजी करारनामे व हालचे (त्याची नक्कल पाठविली असे) असतां, गनिमास आसरा देऊन, फितूर आमच्या मुलकात व सरदारासी करीतच आहेत कौसल कलकत्ते यानी त्यास आसरा न द्यावा म्हणून वरचेवरी लिहीत असता व कर्नेल इपटेन हुजूर हाजीर असता, दुशमनास आसरा देऊन फितुर करीतच आहेत. या गोष्टी उमदे सरदारापासून दूर असेत आम्ही या गोष्टीचा बदला करावा, तरी बहुता दिवसाचा इंग्रेजाचा दोस्तीचा सिलसिला आणि त्याचे करार व लिहिली प्रमाण, तमाम आलमात§ जाहीर होती म्हणून आपल्याकडून तफावत येऊ दिल्ही नाहीं आपण तमाम इंग्रेजाचे खावंद त्यास ताकीद असावी की, ऐसी बदफैली न करीत तुमचा मुल्क जवळ नाही की हे हकीगत पै दर पै तुम्हास पोहचवावी.

इंग्रेज लोकानी या प्रातात काही बाकी ठेविली नाही आपण दुरंदेश, उमदे आणि पुरातन आमचे स्नेहित जाणून, इतिल्ला* केली असे की, गवरनर कौसल बंबई यासी ऐसी ताकीदमय सजावल$ पाठवावी जे घेतला मुलूख व साष्टी वगैरे जंजिरे आमचे आम्हास देत, आमची मालियत साष्टी वगैरेची नेली ते व गुजराथचा पैसा वसूल घेतात व मुल्क पायमाल केला तो ऐवज, व त्यामुळे आम्हास शिबंदीचा खिसारा जाला तो भरून देत ऐसे केले पाहिजे. एक मातबर माणूस हुजूरचा पाठवून सदहू लिहिल्याप्रमाणे अमलात आणावी ते करावे. दुतर्फा एखलास चालत असता व आम्हाकडून काही करारात कुसूर नसता ऐसी खराबी केली. सबब आम्ही तुम्हासी मुलकाची व जंजिऱ्याची व पैक्याची दरखास्त करितो हे वाजवीची राह आहे आलमाच्या जबानीनें ऐकतो की, इंग्रेज बादशाहाचे येथे इनसाफ आहे, व करारात तफावत कधी होत नाही. जरी हे गोष्टी खरी आहे तरी मुंबईकरांस सजा पोंहचावून सदरीं लिहिल्याप्रमाणें अमलात आणवावे, आमचे गनीम आमचे सपूर्द करवावे पुढें आमच्या दुशमनास जागा न द्यावी. त्याची कुमक कोणेही तऱ्हेनें न करावी. जरी तुम्ही हे

† बडखोर. § लोकांत. * खबर. $ शिक्षा, हुकूम.

गोष्टी चष्मपोशी$ करून दरगुजर* कराल, तरी जिकडे वाजवी तिकडे परमेश्वर आहे. आम्ही तो दिलोजानानिसी§ दोस्ती व एखलासी चाहतो. इंग्रेज आम्ही एक असलिया, इंग्रजांचा उदीम व सरकारचा बंदोबस्त राहील. हिंदुस्थान दक्षण कर्नाटक प्रातात कोणाची ताकद नाही की, बदनजर दोहीकडे करील.

---

## ५०

**इ. सं. पे. टि. भा. १ ले. १८]** [ १२ जुलै १७७७

# गंगाबाईचा मृत्यु

**[ हरिपंत फडके यांचें नाना फडणिसास पत्र ]**

श्री

विज्ञापना श्रीमंत मातुश्री गंगाबाई यास सीतज्वर पाच सात दिवस येत होता आम्ही पुण्यास होतो बापू सासवडास होते विशेप दुखणेही नव्हते. बापू आदले दिवशी किल्यावर आले आपाढ शुद्ध ७ चिठ्ठी पुण्यास आली मध्यें अर्ध घटिका गेली नाही, तो देवाज्ञा झाली चिठ्ठी आली इतके लवकर काल होईल असें कळले नाही फारच वाईट गोष्ट झाली ! याचा विस्तार किती ल्याहावा ? मरतेसमयीं आमचे स्मरण केले सावध फार होती बापू जवळ होते, त्यास सागितले की, नानानी व तुम्ही मिळोन, श्रीमंताचे व दौलतीचे रक्षण करावे श्रीमंताचा हात त्याचे हातात घातला रामचंद्र नाईक व शिवाजीपंत सोडावे, व आजीने जवळ असावे बाजीपतानीं जवळ असावे आणखी जवळ आहेत, त्याचे चालवावे याप्रमाणे सागून ईश्वरस्मरणी समाप्त झाली श्रीमंत लहान हीच गोष्ट वाईट जाली स्मरण फारसें करीत नाहीत म्हणोन लिहिले वर्तमान कळोन फारच वाईट वाटले ! होणार ईश्वरइच्छा चुकत नाही ! ! राजश्री बापू, आपण आहेत श्रीमंताचे संरक्षणाची निर्वणूक त्यानी उचित केली मातुश्रीबाई कैलासवासी जाली, ही गोष्ट स्वामीचे जातीस फार उणी पडली परंतु ईश्वरी इच्छेस इलाज नाही. मोठे ठासण † होते करावे काय ? आता श्रीमंताचे रक्षण तीच गोष्ट करावी यात सर्व आहे. हे विज्ञापना

---

$ डोळेझाक. चालढकल. § दील व जान, अंत करण व जीव यासह. † आधार, आश्रय.

# ५१

पे. द. भा. १ ले १९ ] [ २ सप्टे. १७७८

## दौलतींतील तीन पिढ्यांचे फडणीस

**[ खालील दोन पत्रें आनंदीबाई पेशवे यांनी नाना फडणीस व सखारामबापू या दोन मुख्य कारभाऱ्यांस लिहिली असून गृहकलहामुळें ब्राह्मणी राज्य कसें बुडणार याची मार्मिक मीमांसा त्यांत केली आहे तिची दूरदृष्टि व हुषारी हेही गुण त्यांत आढळतात. ]**

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाळाजी जनार्दन यासी,—प्रति सौ आनंदीबाई आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें विशेष वर्ष दीड वर्ष परियंत जाहाले, तुम्हाकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाही. आम्ही होऊन ( पत्र ) पाठवावे, तर कारणाखेरीज आम्हास पत्रें पाठवितात, म्हणोन तुम्हीच हंमाल. हा काळ समजोन पत्रें न पाठविली हल्ली पत्राचे कारण कीं तुम्ही तीन पिढ्याचे दौलतीतील फडणीस असोन, दौलतेची तो गति झाली ती झाली हल्ली यवनाक्रांत ब्राह्मणी दौलत फितुरानी होऊं पाहाते तुमच्या चित्तातील उगीच आटो § जात नाहीं, आणि ब्राह्मणी तो बुडत चालली! या दौलतेत पूर्वी कारभारी झाले, त्याणी ब्राह्मणी स्थापली व दौलतेची वृद्धि केली हा काळ प्रस्तुत श्रीमंतेने असा आला!! इंग्रेज बुंदेलखंडापर्यंत दोन कंपू आले, आणिकही मागून येणार याचा धारीक मोठा विचार जो करणें तो तुम्हीच करणे आम्हास म्हणाल तर आपला जीव काणास नकोसा नाहीं त्या पक्षी दोही गोष्टीचा आदेशा करून, ब्राह्मणपण राहे ते करणें आम्ही येथे तुमच्या स्वाधीन पावणे दोन वर्षे जाहली कार्यसिद्धी तुमची काहीच न जाहाली नुकसान पाच हजार फौजेचे सरजामी गुतले, ही झाली विशेष काहींच न झालें तुमची फौज गुंतून, आमचा धन्याचे पायासी वियोग, हे उभयपक्षी नुकसान आहे तर आम्हास मुंबईस जाण्याविषयी चोटेकरास $ पत्र लिहिणे छ १० माहे साबान बहुत काय लिहिणे हे आशीर्वाद

§ तेढ $ आनंदीबाई ज्याच्या अटकेंत होती तो धारचा दिवाण.

५२

पे. टि. भा. १ ले. १९ ] [ २ सेप्टे १७७८

# ब्राह्मणी दौलत बुडणार

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री सखाराम भगवंत यासी, – प्रति सौ आनंदीबाई नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें बुंदेलखंडांत इंग्रेज दोन कंपू आले आहेत. हुजूरची† पत्रे इंग्रेजास जाऊन इंग्रेज आले. जबरदस्त आहेत दौलत आपणास घेऊन देतो, आम्हास कोटीस आपल्या जवळ जागा द्यावा व आमची फौज नेहमी दहा हजार पर्यंत ठेवीत जावी ही गोष्ट हुजूर कठिण असें समजले परतु ज्यापक्षी रानोमाळ हिंडावे त्यापक्षी कबूल करावे हे समजोन श्रमेकरून कबूल केले हल्ली इंग्रेज घरात येऊं पाहतात. तमाम अंमल उठवून आपले अंमल बसवितात. आमचे निमित्य करून सर्व दौलतेस गिराईक होतील सुजाद्दौले व महमदआल्ली याच्या घरांतून प्रथम चाकरीस येतो म्हणून नम्रतेने पायरव‡ करून घेतली, आणि आता उभयतांस पोटापुर्ते देऊन सर्व दोलतीचे धनी जाले आहेत या सर्व गोष्टी तुम्हास ठाऊक आहेत, तसेच आमच्या घरात होईल. ते जातीने खबरदार व मनुष्यें जवळ चागली, असे असोन, उभयताच्या गती या प्रमाणे जाल्या. आमचे येथे तो कारभारी जवळ मातबर कोण आहे, व पायरव कोणाची आहे, व मर्जीही कोणत्या तऱ्हेची आहे, ह्या सर्व गोष्टी तुम्हास ठाऊक असोन, तुम्ही तिही पिढ्यांचे कारभारी ही ब्राह्मणी दौलत बुडायाजोगी करिता, हे तुम्हास करणे ठीक दिसत नाही तुम्हास हुजूरची मर्जी कोण्या तऱ्हेने समजावल्याने नीट राहते हे सर्व, कोण्या तऱ्हेने विनंति केल्यास बिघडते यास तुम्ही माहीत आहा. पहिल्यापासून आम्हाकडील दिमतीचे तुम्हीच कारभारी. मर्जी राखून सर्व गोष्टी करीत गेला, आणि हल्ली या तऱ्हा दिसतात हे कालचक्र विपरीत आलें परंतु आम्हास हाच भरंवसा आहे की तुम्ही कालचक्रासही फिरवाल हे जाणून तुम्हास पत्र लिहिले आहे. तरी ब्राह्मणी दौलत नीट राहून, हुजूरचाही संतोष राहून सर्व गोष्टी बऱ्या होतील त्या कराव्या न केल्यास जन्मभर चागले

† रावोबादादांची ‡ प्रवेश.

केले आणि शेवटी म्हातारपणी इंग्रेजाच्या घरात ब्राह्मणी दौलत घातली, हे अपेश येई, तो अर्थ न करावा. हुजूर ऐकत नाही असे म्हणाल, तर ज्या पक्षीं तुम्ही प्राण घेतां किवा पेचात आणिता, त्यापक्षीं काय होईल ते हो, परंतु तुमचे हातीं नच लागावे हा निश्चय आहे, तो वाजवी आहे. कोणाचाही पेच कोणासही सोसत नाही. ही गोष्ट सत्यमिथ्या तुम्हीच विचार करून आपल्या चित्तात समजणे. साराश हाच की, इंग्रेजाच्या हाती ब्राह्मण . न चालता, दौलतीचा बंदोबस्त होऊन यावा. विशेष लिहावें तरी तुमचे दशांशही आम्हास समजत नाहीं. परंतु यश अपेश याचे धनी तुम्ही. ही गोष्ट लहान माधवराव पाळण्यात आहेत, त्यासही समजते. मग दहा वर्षावर जे मनुष्य असेल त्यास न समजे असा पर्याय नाही आम्ही लिहून विशेष तो नाहीं. तुम्ही मोजीतही नाही ! परंतु आकार दिसत चालला यास्तव सूचना लिहिली आहे तरी जे कर्तव्य असेल ते विचारे करावे पूर्वी तुम्हास दोन पत्रे पाठविली होतीं, व नवी भावजय$ लाडकी केली, तिचे नाव काय ठेविले, व दुसरी करावयाची कधीं, हा मजकूर विशेष लिहिला होता, त्याचे उत्तर काहीच आलें नाही. पत्रे पोहोचली की नाही हे न कळे. तर उत्तर पाठविणे. रवाना चद्र १० माहे साबान बहुत काय लिहिणें हे विनंती.

## ५३

पे. द्रि भा. १ ले २१ ] [ स १७७८

# अकृतिमपणाचा करार

श्री.

**[ बारभाईचा कारभार कांहीं वर्षे चालल्यावर सखाराम बापू बोकील व नाना फडणीस या दोन मुख्य कारभाऱ्यांचे दरम्यान वैषम्य उत्पन्न होऊन त्याचा परिणाम दौलतीला अपायकारक होऊं लागला. तो मिटविण्यासाठीं पुढील करार उभयतांनीं एकमतानें ठरविला. ]**

---

* दादासाहेब. $ सखाराम बापूनें वृद्धपणी लग्न केल त्यास टोमणा.

यादी श्रीमत राजश्री माधवराव नारायण पंतप्रधान याचे दौलतीविषयी राजश्री बापू व नाना यानी सरळ चालून अकृत्रिमपणे दौलतीचा बंदोबस्त करावा, ह्याविषयीची कलमे, सु॥ तिसा सबैन मया व अलफ —

१ श्रीमंत रावसाहेब याच्या पायाशी उभयतानी एकनिष्ठपणे असोन, अकृत्रिमपणे सरळ रीतीनें दौलतीचा बंदोबस्त करावा श्रीमंत दादासाहेब याचे बरेवाईटाचे लक्ष उभयतान्चें सारखें असावें, व आतबाहेर असू नये

१ नानानी दौलतीत बापूचे वडीलपण सर्व प्रकारें रक्षावे बापूंनी नानावर दौलतीचा भार ठेवावा उभयतानी सरळ चालून अकृत्रिमपणे असावे आपपर किमपि लेखूं नये बरे वाइटास उभयतानी परस्परे अनुकूल असावे साराश, उभयतानी काडीचा संशय न धरिता, एकदिलपणें वर्तणूक करावी दिक्कत वाढली व संशय आला, तरी समक्ष बोलून सशयनिवृत्ति होत जावी, किंतु वाढू देऊं नये आत बाहेर नसावे द्वैतार्थ तिळमात्र नसावा

१ दौलतसबधे कारभाराचे यादीवर बापूनी ' देवावे ' करावें नानानी ' येणे प्रमाणें ' करावे या प्रा॥ उभयतानी चिन्हे करीत जावी

१ बापूस पुत्र होईल, अथवा दत्तक घेतील, त्यास नानानी शहाणे करावें स्वरूपास आणावें बापूंप्रमाणें स्वरूप पाहून त्याचे हातून ' देवावें ' करवीत जावे त्यास वडील सर्व प्रकारे नाना

१ दौलतीत पैक्याची ओढ, याजकरिता जमेची कामे येतील ती उभयतानी मन घालून उलगडीत जावी, अथवा हरएक तरतूद करणें ती उभयतानी अंतःकरणपूर्वक परस्परे अनुकूल राहून करावी दिक्कत नसावी कसर करू नये आत बाहेर असूं नये

१ बापूच्या व नानाच्या जातीस परस्परें आच लावूं नये बापूनी नानास पैक्याचा उपद्रव देऊ नये

१ मागील गुणदोष उभयतानी मनात तिळमात्र वाईट आणूं नये व करण्यात वाईट आणू नये.

१ किल्लेकोटाचा बंदोबस्त पूर्ववत् प्रमाणें उभयताचे विचारे आहे तसा असावा यात वाकडे असल्यास बापूंचे कानावर घालून बंदोबस्त करीत जावा.

१ उभयतांचे मनात वर करण्यांत दौलतसंबंधी वगैरे दरज§ नसावी

१—( फाटलें )

१ साताऱ्याचे खालील कारभारास कारकून पुरंदरे याचा असावा त्यानी उभयतानीं सरळ असावे फडणिशीस कारकून नानाकडील असावा.

१ सचिव पतावर उभयतांची ममता असावी

१ रा मोरोबा दादा व बज्याबा यासी बरेवाईट बोलणे व करणे उभयतांनी एक लक्ष धरून करून, आतबाहेर असूं नये.

१ दौलतीत वाकडे फंद फितूर करतील त्याचा बंदोबस्त, आपपर न पाहाता, उभयताचे विचारे करीत जावा आतून बाहेरून करू नये.

१ बापूंच्या मनात कोणास देणे असले तरी नानास स्पष्ट सागत जावे. नानानी मान्य करीत जावे नानाच्या मनात असल्यास नानानीं स्पष्ट सागत जावे बापूंनी मान्य करीत जावें

१ दौलतीत न समजून वाकडे झाले असेल ते, योग्य अयोग्य असेल ते उभयतानी विचार करून नीट करावे.

१ दौलतीचे कल्याण तीच नीत बापूंनी नानास सागीत जावी त्याजप्रमाणें नानानी लक्ष रक्षीत जावे. उभयतानी परस्परे ध्यान धरून उत्तम तें करीत जावे.

१ दौलतीत कामे काजे व खर्च वेच करणे तो परस्परे परस्परांस बोलून करीत जावा त्यात कुन्हा‡ ठेवूं नये आत एक, बाहेर एक नसावे

१ बाहेर राजकारणें करणे व पाहाणे ही उभयताचीं अतःकरणपूर्वक एक असावी. परस्परे कळवीत जावी आंतून एक, बाहेरून एक नसावें '

§ फूट, भेद. ‡ द्वेष, खुनशीपणा.

५४

**खरेकृत ना. फ. च. पृ. ९७]** [ १५ मार्च १७७९

# बन्धुत्वाची शपथक्रिया

**[ महादजी सिंदे व नाना फडणीस यांनीं बन्धुत्वाची शपथक्रिया केली ती पुढील पत्रांत दाखल आहे. ]**

रा० बाळाजीपंत नाना गोसावी, सेवक महादजी शिंदे दंडवत. आम्हांकडील अर्थ रा. रामचंद्र शिवदेव याणी आपणास सांगितल्यावर आपण शपथपूर्वक खातरजमा करून श्रीवरील तुळसी देतो असे निश्चयपूर्वक बोलला; आणि सरदारी माझी व फडणिशी त्याची, बंधुत्वाप्रमाणे वर्तन करूं, ज्यांत सरदारीचे कल्याण तें संधान चालवूं, जो अनिष्ट चिंतील त्याचे पारिपत्य करूं म्हणून बोलला, तो मजकूर मानिल्हेनीं लिहिला, तो सर्व समजोन चित्तास परम संतोष जाला आम्हीं श्रीवरील बेलभंडार पाठविला आहे, व हे पत्र शपथपूर्वक लिहिलें आहे आपण बंधुत्वाविषयी संशय न मानावा मशारनिल्हे बोलतील ते आमचें बोलणें जाणावे ही सरदारी आपली व फडनिशी आमची असा निश्चय झाला. जेथें आपण आहा तेथें मी आहे. हे शपथपूर्वक जाणावें. रवाना छ १५ सफर. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

५५

**पे. स्फु. ले. भा. ४ ले. १४ ]** [ १० डिसे. १७७९

# " मी काय कुणबी लागलों आहें ? "

**[ इंग्रज मराठ्यांचें युद्ध चालू असतां नाना व महादजी यांमध्यें प्रखर वितुष्ट उत्पन्न झालें. त्याची हकीकत खालील दोन पत्रांत कळून येते. त्या वेळीं भलत्याच कंड्या उठून राज्यचालकांचीं मनें कशीं संशयग्रस्त होत त्याचें उदाहरण या पत्रांत आढळतें. ]**

सेवेसी विनंती सेवक सदाशिव दिनकर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १ जिल्हेज प्रहररात्र सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष—

आज दोनप्रहरीं पुण्याहून रा० बावास पत्र आलें, त्यात मजकूर जे, हरिपंततात्या व परशुरामभाऊ यानीं मनसबा केला कीं, शिदे फार ओढितात, काय चिंता आहे, पाहून घेतो असें पत्र आले, त्यावरून बावांची मर्जी फारच विक्षेपास पावली. कल्पना चालली जे, दिवाकरपंतासीं पूर्वी ( नानांनी ) मनसबा केलाच आहे, त्या अन्वयें उंदरीवर भोसल्याचें फौजेचा जथ पाडिला आहे. नबाबाची फौज १०००० औरंगाबादचे रखवालीचे निमित्त करून गंगाथडीस येत आहे. हुजरात बारा पंधरा हजार पुण्यास जमा झाली. इतका जथ पडिला, तेव्हां पत्राचा मजकूर खरा. हे आम्हास पाहून घेतात तर मी काय कुणबी लागलो आहे की काय ! बरे पाहून घेतात, चिता नाहीं. गुजरातेत रवानगी करण्यास फौज जमा होतच आहे, त्वरा करून आणवावी. पागा आणविल्याच. उभयता मनसब करून आहावर येतात, त्यापक्षी आपणच पुढें व्हावे उभताची गांठ वाटेस पडली, उत्तम, न पडे तर जाऊन श्रीमंताचे पायांवर डोई ठेवून, बधूंस रामराम करून निघोन यात्रेस जावे याउपर यांजवळ राहणे ठीक नाहीं, असा विचार जाला. पत्र कोणाचें आलें त्याचा शोध केला, नाव घेतले नाही. म्हणतात की चौकशी करतील तर पत्रच आहे, अंगी लावून देतो. लिहिणारावर नाना रुष्ट होतील तर त्याचें चालवावयास मजला सामर्थ्य आहे. रुजुवात करावयास चिता नाही अशा कल्पना होऊन फौज व पागा जमा करावयाची ताकीद दिली हें वर्तमान मीं न लिहावे, परंतु नाशास गोष्ट आली असता कसे न लिहावे ? आधी स्वामी येणार असा बावांजवळ निश्चय झालाच होता, त्यावरून आपले येण्यागावेतो सबुरी आहे या मागेच संशय दूर व्हावयाचे नव्हते गंगाजी आल्यावर संशय तुटला होता आता कोणाच्याने काही होत नाही. लाचार. श्रुत होय हे विज्ञापना.

ऐ. प. ले. १८५ ] [ १० डिसे. १७७९

[ याच तारखेचें गंगाजी आव्हाडाचें नानास पत्र ]

येथील मजकूर आज दोन प्रहरा जाला तो दाजींनी* लिहिलाच आहे. आम्ही तेथून आल्यावर इकडील संशय काही दूर केले. पुढें साधन तेच चालत होतें तो आज कोण्या गृहस्थाचे पत्र आले त्यात बजिन्नस खोलून लिहिले आहे. हे बोलतात, श्रीमंताचे ठायीं दुसरा अर्थ धरावयाचा नाही. आम्हीच रामराम करावयास पुण्यास जातो, पण न कळे, पुण्यास गेल्यावर श्रीमंताचे गादीस व भावास अभाव होईल याजकरिता पुण्यास न जाता, कारभारी पुढे येणार त्यासच सामोरा जाऊन रामराम करून देवास ( तुळजापुरास ) जावे या अर्थे आज झाडून पागा शिलेदारास पत्रे गेली मी मोठी शिकस्त करून आपण येथे येतात तावत्काळ सबुरी करावी म्हणून विनंती केली शेवटास गोष्ट येऊं म्हणते. विना श्रीमंत येथे आल्याखेरीज हा सशय दूर होत नाहीं फौज तो जमा करतातच श्रीमंताचे येण्याविशीं इकडील काही अभाव चित्तात येईल तर त्याची खातरजमा आम्ही पाहिजे तशी करू. इकडून श्रीमंताचे ठायी भाऊपणात दुसरा अर्थ तिलतुल्य नाही.

---

५६

पे. टि. भा. ३ ले. २८ ] [ १५ मार्च १७८१

# इंग्रजांस मराठ्यांची दहशत

श्री

[ इंग्रजांचा प्रसिद्ध सेनानी गॉडर्ड यास मराठ्यांनीं हैराण केलें त्या समयाचें हें बातमीपत्र आहे. ]

जबानी जान डबीस मेयर गोलदाज समवेल क्लार्क इंग्रज दि ॥ कपितान मिकलाऊत हा तोफाचे आवाज करावयाचा सरदार इग्रजाचे लष्करची बातमी,—घाटावर तळ्यानजीक गाडर आहे बराबर पलटणे तीन आहेत

* सदाशिव दिनकरानें.

असामी तीन हजारपर्यंत आहेत पैकी गोरे सरदार सर्व व अजारी व चागले मिळोन नऊशे आहेत एकवीस बंगाली व मदराज व मुंबईचे मिळोन आहेत. तोफा आठ; पैकीं थोर सहा शेरी दोन; तीन तीन शेरी लाब लाब पल्लयाच्या कित्ता दोन, तीन शेरी रेजगण मारावयाच्या जवळ पल्ल्याच्या दोन शेरी लहान; एकूण आठ आहेत. पुढें अघाडीस मोरचा आहे, तेथे नऊशे असामी नेहमी रहात्ये, व दोन तोफा तीन शेरी व थोर येक त्याचे बाजूस आहे ती सुटत नाही. दोन लढाईच्या वेळी सुटत असतात दक्षिणेकडील पहाऱ्यापासून उत्तरेकडे तळ्यापर्यंत जवळजवळ रहात आहेत तोफा तैशाच आहेत पाच हजारपर्यंत जमेत मुंबई व बेलापूर, व पनवेल, व कल्याण येथे रसद व दारुगोळा वगैरे जिन्नस आणावयास गेले आहेत. ते आल्यानंतर कूच मुक्कामाचे काय होईल ते न कळे.

परंतु काहीं काही लोक छावणीचा मजकूर बोलतात. जिन्नसाचा पाड ठाऊक नाही सरकारचा शेर खातो. बाजारात जात नाही तळ्यास पाणी जिते आहे बेगमीचे आहे. मोरचास पाणी नाही. त्यास पुढे झिलात डहुरे खणले आहेत, ते कांही नेतात, व तळ्याचे सकेकरी † अणितात. सरकारचे गोळे जातात, त्यास पेशजी गरनाळेचा गाळा मोडला, व दोन गोलंदाज याचे पाय कतरोन गेले, व एक तुरकस्वार याचा घोडा पडला. घाटावर आल्यापासून कालपर्यंत गोलंदाज वगैरे शिपाई पन्नासपर्यंत गोळ्याने व बाणाने व गोळीने ठार जाले. शिवाय जखमी शंभरपर्यंत जाहले ते काही वसईस पाठविले, काहीं खोपवलीस आहेत दररोज लढाईच्या दिवशी दहा पाच असामी जखमी व काही ठार होतात. गोळे टप्पे खाऊन जातात, ते बातेरीच्या मागे गोटात पडतात व उकाल जातात ते तळ्यानजीक गोटांत पडतात त्याणें वाणी बाजारचे काहीं जाया जाले दारूगोळा तूर्त बेगमीचा आहे जिन्नसाचा तूर्त तोटा आहे. त्यास वरचेवर काही येतो

गाडर लढाईच्या समयी येतो. मोरचे फिरोन जातो कोरणेल, गाडर याचा मुतालीक, याचा घोडा गोळ्याने ठार जाला, तो वाचला. हिरव्या पालखीत बसोन गाडर येतो एकाद दिवस हत्तीवर बसोन येतो. चार हत्ती आहेत. पैकीं घाटावर एक दोन आहेत. दोन घाटाखाली आहेत. लोकास रोजमरा महिन्या महिन्या द्यावा, त्यापैकी एक महिना ठेवून बाकीचे वरचेवर देतात.

---

† पखालवाले. सक्का = पखाल, **सक्का तु जलदः स्मृतः** (रा. व्य. को.)

घाटाखाली सहा हजार पावेतो जमात, पैकीं तीन पलटणे व तीन हजार स्वार. कांहीं लोक दादासाहेब याजकडील मिळोन आहेत तोफा चार थोर व गरनाळा चार आहेत. ही बातमी मागील. आम्ही घाट चढल्यावर किती काय आहेत हे ठाऊक नाही

वणजाऱ्याचे बैल चार हजारपर्यंत आहेत. शिवाय बाजारचे वगैरे दोन तीन हजारपर्यंत होतील. बारा हजार कांही बाण आहेत. वसईत सापडले ते आणिले. दादासाहेब तूर्त यावयाचे नाहीं व कुमकही कांही यावयाचे नाहीं. लोक जमातीत बोलतात की पुढे आले तरी येतील. गाडर वसईहून आला. त्यास पुढें कूच करून यावे, तरी हैदर नाईक नबाब याणी त्या प्रातीं जरब बसविली आहे याज करितां मुक्काम करून राहिला

फुलचरीकडून पत्र आलें होतें कीं दोन पलटणे मदराजचीं आहेत, तीं पाठवून देणे, त्यास गाडरास गरज होती म्हणोन ठेवून घेतली आम्ही त्य बिरादतीतील§ आहो. सोनगडाकडील काहीं वर्तमान ठाऊक नाही सरकारची फौजेची आवई लाख दीड लाखपर्यंत आहे. तोफा किती काय आहेत हें ठाऊक नाही. प्रस्तुत इंग्रजांचे लष्करात सरकारचे फौजेची दहशत फार आहे. घाबरें आहेत. चार महिने घाटावर राहून पोक्त सामान करून पुढे पर्जन्यकाल गेलियानंतर पुण्यास यावे ऐसें आहे तूर्त कूच होत नाहीं. तळ्यावर दोन बंगले तयार होत आहेत. काल आम्ही दोघे जण नदीत आंगें धुवावयास आलो होतो तेथे सरकारचे लोकानीं धरून साहेबाकडे आणिले. दोघांजवळ नख्त रुपये वीस होते ते घेतले. जरीची टोपी व आगरखे काळे दोन घेतले होते (इत) र कांहीं आणिले नाही. छ १९ रबिलावल. सु॥ इहिदे समानीन मया व अलफ.

§ जमातीतील.

५७

पे. दि. भा. १ ले. ३७ ] [ स १७८३

# नानांच्या आयुष्यांतील संकट-प्रसंग

**[ नाना फडणिसावर आयुष्यामध्यें कसकसे संकट-प्रसंग आले व ते परमेश्वर-कृपेनें कसे टळले, त्याचें स्वदस्तुरचें टांचण खालीं दिलें आहे. ]**

श्री

श्री हरिहरात्मक ब्रह्म उभयता देव मजवर कृपा करतात, ती वर्णविता बुद्धि चालत नाहीं दान, तप, योग, परोपकार, पूजा, ध्यान, सेवा काही एक घडलें नाहीं व शास्त्रविषय धर्मशास्त्र आदिकरून काही नसता, कृपासमुद्र, दीनदयाळ, भक्तानुकंपी शरण्य ह्या नामाचे सार्थक माझे ठाई केलें

१ नावेत वाहात होतो, तेथें उदकापासून नाव बुडत असता व नावधारी यांणी आपला उपाय नाही, पुढे जवळ खडकावर फुटणार तो नाव काढून वाचविले.

त्रिव्रतकरणाचे तीन प्रकार लिहिले. या वितरिक्त पाणिपतावर बारा तेरादा शत्रूंशीं गांठ पडली. जवळील मनुष्यें मारली, मला वाचविलें

१ नारायणरावाचे वेळेस गाड्याकडून वाचविले

१ दादासाहेबास बुद्धि चागली देऊन रक्षिले,—

१ पुरंदराचे समयी. २ नारायणरावास मारल्यावर. ३ रावसाहेबाचा मोड होऊन पेचात आल्यावर.

१ ज्योतिषशास्त्रास एकीकडे ठेवून रक्षिले

१ तळेगावावर मसलत निघताच दिवा गेला. २ करंडा हरवला. ३ पक्षी डेऱ्यावर बसला. तीन अपशकुन मातबर झाले असता शत्रु पराभव करून यश दिलें.

१ पुरंधरास गेलियावर, 'द्वादशाष्टमजन्मस्थनिरगारको गुरुः' असें अनुक्रमें जाले असता, त्याचें वाईट फळ होऊं न देता चागलें दिल्हे.

१ मंत्रशास्त्र्याकडून शत्रूंनी बहुत अनुष्ठानें करविली व स्वता केली, परंतु माझे वाईट होऊं न देता, उरफाटी शत्रूचीच वाईटे होऊन नाश जाहाले

१ एके मांत्रिकास सप्तशृंगची देवी तेथेच दृष्टात दाखविला की, मोरोबाचे अनुष्ठानें फल होणार नाही, करूं नको नानाकडून केले असतां फल होऊन तुझे कार्य होईल. त्याप्रमाणेच जाहाले

१ एका मांत्रिकास आमचे वाइटाविसी मंत्रदेवताच स्मरेनासे झाले.

१ घोड्यावरून पडलों तेव्हा दोन दिवस भान नाहीं. हे पृथ्वीपासून वाचविलें.

१ दिवाणखान्यांत रुजाम्यावर दिव्याचा कोळी अवशीचे प्रहर रात्रीस पडला. बाहेरून कवाडें लावून कुलूप घातले आत रुजामा पेटला व रुदार पडदा पेटला. त्याणें सुरूदार लांकडी खाव थोडासा जळत होता. दुसरे दिवशीं प्रहर दिवसास झाडावयास म्हणोन कवाड उघडले. पहातात तो रुजामा चार हात व पडदा दोन हात जळाला हळू हळू जळतो अग्नि बारीक म्हणावा तर रुवास जाळण्याचा दृष्टात देतात व लाकडाचा खाब दोन बोटे जळाला. या प्रमाणे अग्नि असता रुजाम्यावर हळू चालतो. सा घटकांत अगदीं दिवाणखाना पेटल्यावर बाहेर कळावे, असे प्रकारचें असता चार प्रहर चार हात रुजामा जळतो. माणसास बुद्ध कवाड उघडावयाची देऊन विझवून टाकविले.

१ गंगाबाई गरोदर असता बुद्ध त्यास काढून न्यावयाची देऊन कीर्ति करून दाखविली दादासाहेबाजवळ पन्नास हजार फौज असता अशी बुद्धि दिल्ही. पुढे पुत्र की कन्या याचा निश्चय नाहीं. मारलेच जावे परंतु कृपा करून रावसाहेबाचा जन्म होऊन सर्वांनी अतर्क्य कर्म केले असे म्हणविले.

१ मोरोबा, होळकर यास सखारामपंतानी एक करून अवघे मातबर त्यांत मिळाले. मी एकटा. परंतु सर्वांचीं पारपत्ये यथायोग्य करवून माझें थोरपण वाढविले. राज्यातील शाहाणे एकीकडे. त्यापुढे मी एकट्यानें काय करणे. परंतु ईश्वराने केले.

१ दगे करणानी केले —

( १ ) बळवंतराव पटवर्धन वगैरे मंडळी मिळून ( १ ) बाळाराम याणी बऱ्हाणपुरावर ( १ ) बाबूजी नाईक याणी तोतयाचे समयी ( १ ) पुरंधर प्रकरण. ( १ ) खंडेराव निंबाजी वगैरे ( १ ) आनंदीबाई. ह्या दग्यापासून रक्षण करून तितक्याची पारपत्ये ईश्वराने केली

५८

**ऐ. टि. भा. १ ले. ११ ]** [ २२ फेब्रु १७८३

## चित्रसंग्रहाची हौस

**[ नाना फडणिसास उत्तमोत्तम चित्रांचा व कलाकुसरीच्या जिनसांचा संग्रह करण्याचा षोक होता. त्यानें ह्या जिनसा मिळविण्यासाठीं किती खटपट केली हें खालील तीन पत्रांत दिसून येतें. ]**

श्री

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी,

( १ ) विनंती सेवक शंकराजी सखदेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता छ १९ माहे सफर मुक्काम दिल्ली स्वामीचे कृपावलोकनेकरून यथास्थित असे विशेष कृपा करून छ १० सवालचे पत्र पाठविलें, ते छ १९ जिल्हेजी पाऊन शिरसा वदून सनाथ झालो. पत्री आज्ञा की, 'आम्हास श्रीच्या चित्राचे मुरक्क्याची गरज आहे याकरिता दिल्लीत निधामल वगैरे जुने कारीगराच्या हातच्या तसबिरा श्रीकृष्णाच्या बहुत चांगल्या मेळवून, किंमत घेऊन, त्यास सोनेरी हासिया ‡ करून, त्याची वही बांधवून बहुत मावजतीने† पाठवावे पैका पडेल तो पाठवून देऊ परंतु तारीफलायक चित्रे मेळवून पाठवावी म्हणोन पत्री आज्ञा त्यास निधामल म्हणून मुसवर § हिंदु, अहमदशहा पातशहाचे अंमलात येथे होता त्याची निष्ठा ईश्वरचरणी बहुत होती म्हणून श्रीकृष्णाची वगैरे देवाच्या तसबिरी हमेशा करीत होता व त्यासमयी काईत $ क्षत्री, मुत्सद्दी, खालसेवाले वगैरे वकील लोक मातबर होते, तेही श्रीच्या तसबिरा करवीत होते त्या अलिकडे अबदालीची गर्दी झाली, त्यामुळे निधामल दिल्लीहून

मुरक्का=पुस्तक, आल्बम ‡ किनार † मावजन=काळजी § चित्रकार* $ कायस्थ.

उठोन लखनऊस गेला. तेथे मृत्यु पावला. त्याचे पुत्र लखनऊस दोघे आहेत. त्यांपैकी एक तो केवळ नाकारच आहे एक काहीसी मुस्वरी करितो. परंतु त्याप्रमाणें नाहीं, म्हणून श्रवणात आलें आहे. त्यास येथे सेवकाने तलाश केला. परंतु आपलेपाशीं राजश्री देवराव तात्यानीं श्रीकृष्णाची तसबीर दिधली आहे, त्याप्रमाणें आता तशा तसबिरा मिळत नाहीत व कोणी हिंदु कारीगरही नाही मुसलमान कारीगर आहेत, ते या काळाप्रमाणे तसबिरा करितात. श्रीकृष्णाचे ध्यानाची तसबीर आपल्या पसंती योग्य करिता येत नाही ऐसे कारीगर आहेत. याहीवर आज्ञेप्रमाणें आजपावेतो तलाश केला, ऐसी जुनी तसबीर हाती लागली नाहीं पुढेंही तलाशात आहे श्रीकृष्णाच्या तसबिरा हाती लागल्यास सेवेसी आज्ञेप्रमाणे तयारी करून पाठवीन या दिवसात येथे कोणी जुने लोक हिंदु मातबर राहिले नाहींत कुल उपासामुळे व बेरोजगारीमुळे लखनऊकडे चागला कारीगर वगैरे कसबी लोक उठोन गेले बहुत मृत्यु पावले काही त्यांचे वंशी आहेत ते नाकारे ! याप्रमाणे दिल्लीची अवस्था जाली आहे पहिली दिल्ली लोकानी पाहिली होती, ते आता राहिली नाही नाव मात्र राहिले आहे रविसंक्रमणाचे तील शर्करायुक्त पाठविले आहेत ते स्वीकारून उत्तरी लोभ करावा बहुत काय लिहिणे, कृपा केली पाहिजे हे विज्ञप्ति

श्री

[ २५ मे १७८६

सेवेसी कुसाजी गोविंद साठे सा। नमस्कार विज्ञापना ता। वैशाख व॥ १३ गुरुवार पावेतो स्वामीचे कृपेकरून वर्तमान उत्तम असे विशेष स्वामीचे पत्र आले. तेथे आज्ञा कीं, बज्याबा पुरंधरे याचे घरी पूर्वी नानापासून चित्राचा संग्रह आहे आम्हास ठाऊक आहे त्याचा शोध त्याजकडील कारभारी बोलावून, आमचे अंग न समजता, जी चित्रे असतील ती झाडून घेऊन, लिहून पाठविणे म्हणोन आज्ञा पत्र आलें. त्या वेळेस सासवडी कारकुनापासून तों कारभारी याचे घरी लग्ने. ते झाडून तासगावास गेले आहेत. दुसरा माहितगार कारकून सध्या त्या मुलाजवळ नाही त्याजवरून मुजरद पत्र लेहून, दोन गडी कारभारी यास आणावयास पाठविले आहेत आले म्हणजे शोध करून जी जी ( चित्रे ) असतील ती झाडून घेऊन, सेवेसी लेहून पाठवीन नानाचे वेळेचा खिजमतगार जुना, नेहमी बजाबाची कन्या आबीकराचे घरीं दिल्ही आहे, तिजबरोबर असतो.

बहुता दिवसाचा आहे. त्यास मी पुसले त्याणे सागितले की, नाना होते तोपर्यंत त्यास हौस येविसी फार होती सग्रह होता अलीकडे बज्याबापासून काहीं (चित्रे) लोकानी नेली व काही आहेत ऐसे त्याणे सागितलें, असल्यास गुंता तेळप्राय न पडता त्याचे घरची मातुश्री उमाबाई – आबाची स्त्री – याजकडे, स्वामीचे अग न दिसता, असतील ती जमा करून सेवेसी लिहून पाठवितों. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

श्री

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी — विनति सेवक पाराशर दादाजी † सा० नमस्कार विज्ञापना, येथील कुशल छ २५ रबिलाखर यथास्थित असे विशेष:—आपण कृपापत्र पाठविले ते पावले राजश्री आनदराव गगाधर यास उत्तम तसविरा पाठविण्याबद्दल तुम्हास सूचना करण्याकरिता लिहिले होते त्यानी तुम्हास सागितले तुम्ही दिल्लीस तसवीरा आणावयाकरिता पाठविलें. त्यास तेथे खासगी कोणाचे घरी असल्या तर माहितगारीनें हस्तगत जाल्या तर होतील जयपूरकराचे घरी तसविरा फार चागल्या (आहेत) ही पक्की बातमी बहुत दिवस आहे येविसीचे सविस्तर आनदराव यासी लिहिले आहे, त्या अन्वयें युक्तीने केल्यास येतील ' म्हणोन आज्ञा त्यास आनदराव यानी आपले आज्ञे प्रमाणे सागितले त्याजवरून जयपुरीही कारभारी यासी लेहून कारकून पाठविले आहेत राजाचे भेटीचेंही बोलणे आहे त्या सधीत शोध करूं दिल्लीस शोधाकरिता मुजरद परीक्षक पाठविले आहेत यत्नास आळस होणार नाही दिल्लीस हुडीही रवाना केली आहे आनदराव सविस्तार लिहितील सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

## ५९

**का. सं. प. या. ले. ३९३]** [८ जाने १७८३

# तेरा कलमी उपदेश

**[नारायणराव पेशव्याचा पुत्र सवाई माधवराव ता. १८ एप्रिल १७७४ रोजीं पुरंदरावर जन्मास आला त्याची आजी गोपिकाबाई नाशिकजवळ गंगापुर**

† पाराशर दादाजी ऊर्फ पाराजीपंत—होळकराचा सरदार, पानपतावर मोठ्या शिकस्तीनें बचावलेला . आनदराव गगाधर चद्रचूड – सिंधाचा दिवाण

**येथें कायम वास्तव्य करून होती, तिंने या होतकरू नातवास खालील वर्तनक्रम शिकविला आहे. पेशव्यांच्या घराण्याचे रीतरिवाज व शिक्षणमार्ग कसे होते हें या त्रयोदश कलमी लेखांत दिसून येतें. ]**

श्रियासह चिरंजीव राजश्री माधवराव प्रधान यासि प्रति गोपिकाबाई मुक्काम नाशिक, आशीर्वाद उपरी येथील तागायत छ ४ माहे सफर जाणून स्वकीय कुशल वर्तमान यथास्थित असे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पावले

" मी लहान, वडिलीं सर्वत्याग करून श्रीक्षेत्री वास केला आहे, त्यास सर्व माहीत वडिलास, यास्तव कोणे रीतीने चालावे हे सर्व ल्याहावयास आज्ञा व्हावी, " म्हणोन लिहिले त्यास. सूर्यग्रहण संधिअन्वये कृष्णपक्ष होऊन लोप जाहला होता तो हल्ली पुण्योदये करून दुष्टाचा संहार व सुष्टाचे पालग्रहणार्थ तुम्ही या कुळात जन्म घेऊन पुरंदर येथे उदयास आला, त्यापक्षीं इकडून लिहावयाचे कारण दिसत नाही परंतु मानवी देह आणि तुम्हीं लिहिले, त्यापेक्षा तूर्त चालावयाचें जे सुचले ते लिहिले, आहे. तपसील कलमबंदी—

१ प्रातःकालचे घटका रात्रौ उठोन दिशेस जाऊन पादप्रक्षालन मुखप्रक्षालन करून दिवाणखान्यातील श्री मृत्तिकागणपतीचे दर्शन घेऊन प्रातःस्मरणाचे श्लोक म्हणावे नंतर सूर्योदयाबरोबर वैद्यानी येऊन हात पहावा प्रकृतिअन्वयें औषध घ्यावे नंतर लिहावयास बसावे कित्यात हात फिरवून मग ज्या कागदावर निशाणे ‡ व्हावयाचीं असतील ते लिखितान्वयेंच वाचावे ते समयी जवळ गुरुजी* व आणखी एक दोघे संभावित योग्य असतील ते असावे. जास्त असो नये येणेप्रमाणे घटिका तीन येकूण घटिका . . कलम १

१ तालीमखान्यात जाऊन दंड काढावे दिवसेदिवस शक्ति अन्वये चढते दंड असावे बरोबर समवयी मुले पाच चार संभाविताची असावी, व जेठी एक दोघे व नेहमी विश्वासुक गृहस्थ बरोबर असावयाचे ते असावे खिजमतगार कार्याकारण असावे जेठी यानी कुस्तीचे डाव शिकवावे नंतर समवयी मुलासुद्धा प्रकृतीस जो खुराख मानेल तो नेमेंकरून घेत जावा. येणेप्रमाणे घटिका दीड येकूण घटी साडेचार......कलम २

‡ निशाणें=शेवटील अक्षरें. " आज्ञा प्रमाण " ही सही ऐवजी घालीत. लिखितान्वयें म्हणजे लिखितें समजून.

* महादाजी बल्लाळ गुरुजी, थोरल्या माधवरावाचा इतबारी, उपनाम करकरे.

१. स्नान करावयाचे समयीं पंचाग जोशी वाचून संकल्प सागावा. नंतर गंगाष्टक म्हणावे; संध्या थोडकी, परंतु न बोलता करावी. तर्पण करावें. उपाध्ये याणी पूजा करावी. ते समयी पुराण देवघरात व बाहेर गायन होत असावे. आपण तुलशी फुले माळा वहावी नंतर नित्य दाने देऊन क्षणभर बसावे. ते समयी शास्त्री व वैदिक महान् शिष्ट आल्यास नमस्कार करून योग्यतेनुरूप उत्थापन देऊन काही भाषण करावे. नंतर उपहार करावयास जावें येणेप्रमाणे घटी साडेतीन येकूण घटी आठ......कलम ३

१ कचेरीस यावे ते समयी सर्वांक्ष देऊन योग्यतेनुरूप नेत्रलाभ व भाषण होत असावें. कचेरीत लघु शब्द बोलूं नये व गैर नि ही [?] बोलूं नये मनुष्यपरीक्षा असावी. गैरवाखा एखाद्याने समजाविलेस पक्केपणी विचार करून अपराध ठरल्यास दुसऱ्याकडून त्यास निषिद्ध करवावे. आपण नेत्रकटाक्ष करून पहावे अपराधानुरूप पारपत्य करावे, परंतु संभावित गृहस्थ बहुत दिवस पदरीचा प्रामाणिक, अशाने रदबदली केली असता क्षमा करावी. दुसऱ्याचें क्षुद्र काढूं नये. येणेंकरून त्याचा अपमान होतो, आणि तो त्याचे मनात दंश राहतो, साधल्यानुरूप नाश करील, आणि आपल्यास लघुपणा येईल संनिधानीं लोभात लघु मनुष्य राखल्यास जे केले त्यास ते रुकार देतात, परंतु जन लोक वाईट म्हणतात, थोरपणास हानि होती येणेंप्रमाणें घटी तीन येकून घटी अकरा .. ..कलम ४

१ भोजनाचे पूर्वी सोवळे जाहले नंतर थोरल्या देवघरात जाऊन फुले घालून, नमस्कार करून, ब्राह्मणास उदक सोडून, भोजनास बसावे ते समयी भाषण करावे ते राजसूययज्ञातील ब्राह्मणभोजन प्रकरणी वगैरे योग्य सर्वांस दिसेल ते बोलावे पाक करणार व शिष्यमंडळी सुशिक्षित विश्वासुक असतील ते बाळगावे घटी २ येणेप्रमाणे घटी १३......कलम ५

१ भोजनोत्तर आचमन करून शतपदी करून ताबूल घ्यावा नंतर दोन घटिका राजविलास खेळ खेळावे एकादे दिवशी निद्रा आल्यास घटी अर्धघटिका निजावे. येणेंप्रमाणे घटी २. येकूण घटी पंधरा......कलम ६

१ शास्त्री याजवळ विराटपर्वापासून भारतातील चितनिका करीत असावी, व वृद्ध मनुष्ये पदरची बहुत दिवशीं व अन्य शहाणे असतील त्याशीं दिल्ली प्रकरणी व महाराज प्रकरणी गोष्टी कशा जाहल्या त्या ऐकण्यात असाव्या. आपले वडिलाच्या गोष्टी कारभारी यासीं एकात स्थळी विचारीत असावें; व

तसबिरा व नकाशे अनेक पहात असावे. ते समयीं शाहाणे बुद्धिमान असतील ते जवळ असावे. येणेप्रमाणे घटिका चार. एकूण घटिका. १९......कमल ७

१ खर्डे लिहावयास बसावें, ते समयीं एक दोन मुलें संभावित गृहस्थाची बुद्धिमान पहावयास असावीं. करदन, बस्तन, गुणाकार, भागाकार करावयाचा सराव बहुत असावा. गुरुजी यांनीं विद्याभ्यासाकरितां बोलणे प्राप्त आहे. परंतु लिहावयाचे जागींच बोलणे. तेथे विशेष कोणी असो नयें घटी चार एकूण घटिका तेवीस......कलम ८

१ लिहिणे जाहले नंतर कांहीं उपहार थोडासा मर्जी असल्यास मुला-समवेत घेऊन करावा. नंतर ताबूल घ्यावा. घटी एक. एकूण घटिका चोवीस ...... कलम ९

१ घोडीं फेरावयास चार रोजांनीं जात जावे. ते समयीं बरोबर पटवर्धन मंडळी व अन्यत्र सरदार असावे त्याशी भाषण करणे ते संतोषवृत्तीने करावे. परंतु अत्यत लोभही नसावा व विरुद्धही न दाखवावें. काहीं अंतर जाहल्यास क्षमा होणार नाही असे भय असावे. योग्यता बघून त्याशी भाषण संतोषे करून करावे आठा दिवशी बाग पहावयास गेल्यास जिन्नस तेथे फुले व फळे जी आणून पुढे ठेवतील ती योग्यायोग्य बघून त्यास देववावीं व आपण द्यावयाची असतील त्यास आपण देऊन मग यावे. ज्या दिवशी स्वारी जावयाची नाही, त्या दिवशी कागदपत्र दवलत प्रकरणीं असतील ते कारभारी याणीं समजावीत असावे. ते समयी कोणी असो नये व गंगा भागीरथी ताईसाठी* याची भेटी चार रोजी एक वेळ घेत असावी. त्यांसच वाड्यात यावयाचा बेत व्हावा. नतर त्यास बहुत संतोषेकरून बोलावे व मूलपणाने बोलण्याचा डौल दाखवावा. वाड्यातच आज रहावे असा आग्रह करून ठेवून घेत जावी. दिवाण याणी राजकारणाचें वर्तमान व पुढील योजना करावयाचा विचार करून विंनति करीत असावी त्या समयी अन्यत्र कोणी असो नये व त्यातील अभिप्राय दुसऱ्यापाशी निघो नये. म्हणजे मसलती असाध्य होत नाहीत. बातमी हरतऱ्हेची राखावी, म्हणजे मसलतीस बल बहुत आहे पदरच्या मनुष्याचें चालवावयाचें त्यास जिकीर करूं नये. एकूण घटिका अठ्ठावीस ...कलम १०

---

* मातुश्रीची आई.

१. तिरंदाजी करावयास जावे. तेथे बरोबर सरदार व पागे व मानकरी बरोबर असल्यास तीर कोण कसे मारताहेत ध्यानात असावें व हरएक खेळ पहावयाचे ते सर्वत्र समवेत पहावे येणेंप्रमाणे घटिका दोन, एकूण. घटिका ३० कलम ११

१ दीपदर्शन जाहल्यानंर संध्येस वस्त्रातर करून बसावें संध्या जाहलेनतर स्तोत्र पाठ म्हणावा नंतर पुरुषसूक्त अथवा पवमानातील अध्याय म्हणावे ते समयी आश्रितानीं जवळ असावे नतर भोजनास जावें भोजन होऊन उठेपर्यंत घटी चार . कलम १२

१ भोजनोत्तर ताबूल खावयास दिवाणखान्यात क्षणभर बसून ताबूल घ्यावे. नंतर कार्याकारण मंडळी जवळ असावी ते समयी बातमीदार यांणी वर्तमान गुप्त सागत असावे, व हरएक बातमीची पत्रे आलेली पहावयाजोगी असतील ती पहावी, बाकीची पत्रे विश्वासुक मनुष्य कोण असेल त्याजकडे काम योजावें, त्याणी सागावें व त्यावर ही बातमी प्रमाण अथवा अप्रमाण सागतात याची चौकशी असावी नंतर निद्रेस जावे. येणेप्रमाणे घटी तीन एकून घटिका सात.

एकूण कलमे तेरा लिहिलीं आहेत, ती ध्यानी आणोन चालल्यास उपयोगीं पडतील. बहुत काय लिहिणे हे आशीर्वाद

---

६०

**ग्वा. पत्र सं. ले. २९३ ]** [ २० मार्च १७८४

# पाटीलबावांची कामाची रीत

**[ सदाशिव दिनकर म्हणून नाना फडणिसाचा वकील महादजी शिंद्याजवळ होता, त्यानें हें पत्र नानास पुणें येथें लिहिलें आहे. यांत महादजीची काम करण्याची पद्धत व्यक्त होते. नेहमीं जवळ पुष्कळ लोकांचा घोळका असून, लगोलग साफ जबाब देण्याची शिस्त महादजीस नव्हती. नाना फडणिसाचा प्रकार याच्या अगदीं उलट होता. ]**

पैवस्ती चद्र जमादिलावल आर्बा चैत्र

छ सेवेसी विनती सेवक सदाशिव दिनकर साष्टाग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २७ रबिलाखर मुक्काम नजीक गोहद स्वामीचे कृपावलोकने करून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष

चंद्र २ रबिलाखरचे पत्र सादर जाले मजकुराचा हवाला सरकारचे पत्रावर लिहिला पत्रे चंद्र १६ रोजी पावली राजश्री पाटील बावा यास पत्रे श्रीमंताची होती ती प्रविष्ट केली जाबाचा प्रकार येथील विदितच आहे पेशजीच्या तीन रवानग्याचे पत्राचेही जाब राहिले आहेत दोन रवानग्याचे जाब आताचे चंद्र १ व चंद्र २ रबिलाखर इतके जाब मागतो फार खलबतात दिवस जातात खलबत नसले तर भलते काम घाशीत बसावे त्यापुढे दुसरे मोठे अगर नाजूक काहीच नाही त्यातच काही हटकिले, तर थट्यात न्यावे, मग आज उद्या म्हणावे. फारच दाटी करुन गाठावे, तर बातम्याचे निमित्त करून उल्हार्णी व विक्षेप नाना प्रकारची छद्मे बोलण्यात आणून विपर्यास दाखवावे ही रीत समजलीच आहे हा नित्य संबध आहे, तपशील किती विनवावा ?

हल्ली चंद्र १ व चद्र २ रबिलाखरच्या पत्रात इंग्रजानी टिपूसी सल्ख परभारा केला ही अडचण याजकरिता प्रातःकाळी गाठून, वारंवार म्हणून भीड* दूर करविली त्यात कारीगर ‡ टळतच नाही त्या निराळे उभे राहणार व बसणार, जवळपास एकूण पंचविसास कमी नसतील, जास्त होते त्याज देखता भानगड दोन प्रहरपर्यंत जाली आमचे सोबती राजश्री आपाजी रामही † होते, दोन प्रहर पावेतो भाषणात जे तपशील निघाले आहेत तो किस्सा § किती लेहावा ? पुष्कळ विस्तार आहे त्यापैकी संकलित मजकूर श्रीमताचे पत्री विनविले आहेत बावानी उत्तर दिलेच नाही इग्रजानी परभारा सल्ख केला असे लिहिले आहे, ते इंद्रसेनास $ सागोन पाठविले त्यानें उत्तर दिल्हे जे, हे गोष्ट सहसा घडावयाची नाही तुमची पत्रे आली याजकरिता मी पत्रे इंद्रसेन आमचे ज्येष्ठ बंधूस लेहून पाठवितो जाब आल्यावर सागेन इद्रसेनाने पत्र ज्येष्ठ बंधूस लिहिले आहे त्याचा जाब यथास्थित आल्यास तुम्हास जाब लिहून देऊं यथास्थित इंद्रसेनाचें उत्तर न आले तर इष्टीन + काशीस आला, मागाऊन चौ

---

* गर्दी. ‡ हजाम † उपनाव व दाभोळकर, सिंद्याचे कारभारी § हकीकत, कहाणी $ सिंद्याचे दरबारीं राहणार इंग्रज वकील अँडर्सन + गव्हर्नर जनरल वॉरन हेस्टिंग्स

रोजी इंद्रसेन काशीस आला असेल इष्टिनाचे आमचे भेटीचा प्रकार ठरला आहे. भेटी लौकरच होणार त्यासी बोलून निश्चयात आणून मग तुम्हास जाब देऊं अगोदर लेहावें काय ? सांगितला मजकूर तुम्हीच लेहून पत्रें रवाना करणे बावानी सांगितल्यावरून मीच श्रीमंताचे सेवेसी विनती पत्रे लेहून जोड्या रवाना केल्या त्या पत्रावरून लिहिण्यातील सकलितार्थ गर्भार्थ सविस्तर विदित होतील श्रीमंताचे पत्री आज्ञा होती जे, पत्रे पावतील ती तेरीख लेहून पाठविणे त्यास चंद्र १ व चंद्र २ ची पत्रे चंद्र १६ तेरखेस पावली एकूण चौदा रोजा पंधरा रोजानी पत्रे येथे पावली, ती बरीच आली कधी अठरा दिवसा कधी वीस, पंचवीस कधी अधिकही दिवस लागले आहेत चौदा पंधरा रोजानी पत्रे बरी आली सवानिसाकडून राजश्री नारोपंतास पत्रे पाठविण्याविषयी ताकीद फार येते, तो घाबरा होतो पुण्याहून पत्रे डाकेने रवाना होतात. ती किती दिवशी उज्जनीस पावत असतील न कळे उज्जनीहून जोडी छुटी टकटे येते, तीस दहा अकरा रोज लागतात चाकर जोड्या दहा अकरा रोजानी पावतात म्हणून नारोपंतानी दोन तीन जोड्या अजरदार पाठविल्या एक दोन इनामी आल्या अजुरा तर मजवर लिहिला नाही इनाम लिहिला त्या आशेवर सहा रोजानी जोड्या येऊन पोहोचल्या बावा इनाम देतात कळलेच आहे कागद लगाल्गा डाकेचा चालावा नववे रोजी उज्जनीहून खेप्या पुण्यास जातो डाकेवर कागद सातवे दिवशी तरी पोहचावा तिकडून विलंब करून उज्जनीस कागद पावत असल नारोपंतास ताकीद लिहिल्यास त्याने काय करावे असे सरकारात व सवानिसास समजले पाहिजे म्हणजे डाकेसह ताकीद होईल, नारोपंतास निकट करणार नाहीत. आणखी पुरवण्या निराळ्या विनविल्या आहेत त्याचीं देखील उत्तरें पाठवावयाची आज्ञा जाली पाहिजे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

---

अजुरा = मजुराची रक्कम

## ६१

ग्वा. पत्रें ले. ३६८ ] [ २० मार्च १७८५

# आगऱ्याचें बातमीपत्र

**[ हें पत्र आगऱ्याहून सदाशिव दिनकरानें पुणें येथें नाना फडणिसास लिहिलेलें आहे. हा चतुर लेखक राजकारणांत निष्णात व पेशव्यांची बाजू सांभाळण्यांत दक्ष असे. पुढील पत्रांत लहान वाक्यें लिहिण्याची शैली, दोघी स्त्रियांनीं एकदम सती जाणें, दत्तविधानाचा विधि वगैरे प्रकार स्मरणीय आहेत. ]**

छ विज्ञापना ऐसी जे,—

बळवंतराव धोंडदेव यास शुळाची व्यथा चार पांच महिन्यापासोन उत्पन्न जाली त्यात हगवणही होती. उपाय फार केले, साध्य जाले नाही. जेष्ठ स्त्री देशीहून कन्येचे लग्न करून निघोन आली, ती येथे पावली दोघी स्त्रिया जवळच होत्या औषध उपयाची सीमा जाली काही साध्य न जाले निधना पावेतो आलें. तेव्हा राजश्री पाटील बावास सागितले की आमची ही दशा आहे. यत्न करून पाहिला, काही साध्य नाही निदानच दिसते इतकीच आयुर्मर्यादा होती. यास उपाय नाही. पाच लक्ष आम्हास देणें ते वारावे तर गति आमची होईल व सरदारी चालली पाहिजे बावानी विचार पुसला. तेव्हा म्हणां लागले, आमचे तीर्थरूप धोंडोपंत त्याचे प्रत्यक्षबंधु खडोपंत, त्याचें पुत्र सदाशिवपंत येथेच आहेत. परंतु आम्हातून विभक्त जाले त्याची आमची वाटणी होऊन फारकत्या जाल्या. कजिया तुटला. केसोपंत धोंडोपंताचे चुलत बधु परंतु एकत्र संसार चालतो केसोपंताचे पुत्र हरबाजीपंत आम्हाजवळच आहेत. एकत्र ससार आहे त्याचा वांटा जाला नाही. सध्या देवरी किल्ला त्याजजवळ आहे त्याचा पुत्र रघुनाथराव आम्हाजवळ आहे त्याचे दत्तविधान करून पुत्रत्वात देऊन डौल× चालविले पाहिजे बळवंतराव आपले डेऱ्यास विकलच होते. मध्यस्थ गृहस्थ बावाकडे पाठवून लिहिल्या अन्वये जाबसाल केला तो बावानी मान्य केला दत्तपुत्र घेणे असी परवानगी दिली. याजवरून बळवंतराव याचे घरी दत्तविधानाचा समारंभ करून बावास सांगोन पाठविले बावानी राजश्री माधवराव गंगाधर‡ व आबा चिटणीस

× कारभार. ‡ चद्रचूड.

पाठविले की दत्ताविधान जाले म्हणजे त्या मुलास वस्त्रें द्यावी. हे उभयता बळवंतरावाचे डेऱ्यास गेल्यावर मजलाही बोलाऊ पाठविले. गेलो तों दत्तविधान-प्रसंग होता. पाहिलें, व उभयतानीं वर्तमान सदरीं विनंति केल्याप्रमाणें सांगितले चैत्र अधिक शुद्ध १० चे दिवशी † प्रहर दीड प्रहर दिवस पावेतो बळवंतराव बोलत होते तंव वैद्यही होतेच व दत्तविधानास आरंभही केला पुढें फारच विकल होत चालले. दोघी स्त्रिया मोठ्या सावध राहिल्या त्यानीं स्वागे धनीपणा करून औघा बंदोबस्त राखून खेदाचा लेशही कोठें दिसूं न देता स्थिरबुद्धि व धैर्यबले दत्तविधान यथास्थित करून मूल घेतला सदाशिवपंत, खंडोपंताचे पुत्र, बळवंत-रावाचे चुलत बंधु जवळ होते, तेही अनुकूल जाले दत्ताविधान झाल्यानंतर वस्त्रे आणिली पागोट्याचा पदर माधवराव गंगाधर यानी घेऊन सेवकाचे * हातीं दिला. मीं उत्तर केलें की बावा श्रीमंतांचे ठिकाणी आहेत. त्याचे केले सर्वांस मान्य आहे माधवराव यानीं म्हणाले, जे बावानी कबूल करून हा प्रसंग सपादावयास आम्हास पाठविलेंच आहे, तुमचे हातून वस्त्रे देववावी असी मर्जी आहे तेव्हा मी पागोट्याचा पदर सदाशिव खंडेराव याच्या हाती दिला त्यानी दत्तपुत्र रघुनाथराव यास पुत्रत्वाचें पागोटें बाधिले शेला घातला नंतर प्रहर दीड प्रहर बळवंतराव होते दशमीसच आगऱ्याचे मुक्कामी यमुना तीरी संध्याकाळचा चार घटिका दिवस राहता बळवंतरावास देवाज्ञा जाली. दोघी स्त्रियानी शाबुती धरून दानधर्म आदिकरून सर्व कर्म यथाशक्ति यथास्थित आपले आज्ञेने वंचक बुद्धि टाकून साग करून सहगमन केले. चिता रचून दोघी स्त्रिया दोहीकडे निजून स्वहस्ते अग्निप्रवेश करविला. लष्करात सर्वतोमुखी अशा सत्या शाबूत कोठें पाहिल्या नाहीत असी व्याख्यानें जालीं. ईश्वरेच्छा प्रधान. बळवंतराव समाप्त जाले. दत्तक पुत्र घेतला, त्याचे बंदोबस्ताकरिता बावा सेवेसी लिहितील. मजला सागतील तर विनंतीपत्र लेहावे लागेल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

† २० मार्च १७८५. * पत्र लेखक सदाशिव दिनकर.

## ६२

ऐ. टि. भा. १ ले ४० ] [ २ सप्टे १७९१

# घाशीरामाची कोतवाली

श्री

[ घाशीराम सावळदास नांवाचा औत्तरीय ब्राह्मण स. १७७७ पासून १७९१ पर्यंत पुण्याचा मुख्य कोतवाल होता. हा गौडब्राह्मण औरंगाबादचा राहणारा, बातम्या काढण्यांत कुशल असून नाना फडणिसाच्या मर्जीतला होता. त्यानें पुण्याच्या लोकांवर अनेक तऱ्हेचे जुलूम केले असा पुण्यांत बोभाट झाल्यामुळें सवाई माधवरावानें त्यास पकडून आणून मृत्यूची शिक्षा दिली. ता. ३१ ऑगस्ट १७९१ रोजीं पुण्यांत जमलेले कांहीं तेलंगी ब्राह्मण घाशीरामाच्या कैदेत मृत्यु पावले, त्यांची हकीकत खालील पत्रांत वर्णिलेली आढळते. पत्र बारामतीकर जोशांच्या दप्तरांतील आहे. ]

वडिलाचे सेवेसी सा नमस्कार—

विज्ञापना ऐसीजे— पुण्याहून पस्तीस असामी तैलंग ब्राह्मण आपले देशास जाण्याकरिता निघोन घासीराम कोतवाल याचे तळ्यावर गेले, आणि सायंकाळचे चार घटका दिवसास स्वयपाक करावयास लागून अस्तमान दोन घटका रात्रीस भोजन केले नंतर चार घटका आटपाआटप करावयास लागली. तो इतकियात कोतवालाचे प्यादे त्याचे पेठेतून पाचसात प्यादे जाऊन, तितक्या ब्राह्मणास भवानीपेठेतील चावडीस आणून, एका खणाचे भुयार आहे त्यात पस्तीस असामी कोंडिल्या. त्यात वारा जाण्यास जागा नाही. सबब, ब्राह्मण आत कोंडमारा होऊन एकवीस असामी मृत्यु पावले घातल्यापासोन तिसरे रोजीं, रा मानाजी फाकडे चावडीजवळ राहातात, त्यास त्या भुयारात गलबा होऊं लागला हा कशाचा म्हणोन, आपण खुद त्या भुयाराजवळ जाऊन कुलूप तोडवून पाहिलें, आणि श्रीमंतास ब्राह्मण मेल्याचें वर्तमान सागून पाठविले नंतर श्रीमंतानी चार प्यादे व एक कारकून चौकशीस पाठविला. तो इतकियात घासीराम याणें वाड्यात येऊन विंनती केली जे, कोमटी पंचवीस तीस असामी माझे तळ्यावर येऊन राहात आणि शहरात चोऱ्या करीत होते, त्यास धरून

आणून ठेविले. त्याणी अफू खाल्ली तेणे करून मृत्यु पावले. आज्ञा जाहाल्यास मूठमाती देतां उत्तर जाहाले जे, चौकशीस कारकून गेला आहे, तो आल्यानंतर सागणे ते सागू. असे बोलून, चिंचवडचे देवास पुलापलीकडे सामोरे गेले. तेथून स्वारी फिरोन बेलबागेत आल्यावर घासीरामाने गाठ घालून गैरवाका समजावून मूठमातीची परवानगी घेतली आणि आपले घरास गेला इतक्यात श्रीमंत राजश्री रावसाहेब* यानी श्रीमंतास§ बोलावूं पाठविले वाड्यात गेले तेव्हा रावसाहेब याणी विचारिले जे, घासीरामाने ब्राह्मण मारिले, त्यास त्याची चौकशी होऊन घासीरामाचे पारपत्याचे काय ठरविले? उपरात, आज्ञा होईल तसें करूं म्हणोन बोलून, घासीरामास बोलावूं पाठविले तो आला तो श्रीमतही सरकार वाड्यातून आपले घरास आले, आणि वो भटजीतात्यास चौकशी सागितली त्याणी कोतवाल मजकूर यास, ब्राह्मण कशाकरिता कोंडिले व मरावयाचे कारण काय? जे खरे असेल ते साग, असा प्रश्न केला तेव्हा त्याणे उत्तर केले, जे चोर म्हणोन कोंडिले ते अफू खाऊन मेले यात माझे काही कृत्रिम नाही असे म्हणत आहे तो रावसाहेबाचा निरोप आला जे, त्याचे पारपत्य चागले करावयाचे याचे म्हणणे तो या प्रकारचे व श्रीमंत राजश्री नानाचे वाड्यापासी हजार-पंधरासे ब्राह्मण मिळोन नाना प्रकारच्या वल्गना करूं लागले. तेव्हा सर्व मजकूर भटजीनी श्रीमंताचे कानावर घालून, कोतवालाच्या मुसक्या बाधून गाड्याचे पहाऱ्यात ठेविला तरी तैलंग ब्राह्मण आतित्यायीपणास न चुकत! हत्तीचे पायास बाधल्याशिवाय आम्हास आपले बिराडी जावयाचे नाही. नंतर वे॥ राजश्री अय्याशास्त्री यास ब्राह्मणाचे मध्यस्तीस घातलें जे, उदईक तुमचे म्हटल्या-प्रमाणे याचे पारपत्य करतो तरी ब्राह्मण न ऐकत शास्त्री याचे आगावरील वस्त्रे, धोत्र नेसावयाचे सुद्धा झोबून फाडिले, व श्रीमंताचाही निग्रह पाहून, प्रथम प्रहर रात्रीस हत्ती आणवून वर्ती त्यास घालून बाधिला, आणि सर्व शहर फिरवून पर्वतीजवळील रमण्यात नेऊन पायात बेडी घालून ठेविला. शहरातून फिरते वेळेस ब्राह्मणानी कोतवालास पाच सात दगड मारिले तेणेकरून कांही डोकीं फुटली होती, व शंभर गाडदी चौकीस होते. नंतर दुसरे रोजी, भाद्रपद शुद्ध द्वितीया बुधवार प्रातःकाली, ब्राह्मण मागती दोन हजार पावेतो आजमासे जमा होऊन, श्रीमंताचे वाड्यापुढे बहुतच गरगशा करू लागले, आणि बोलत जे, त्यास जिवे मारल्याशिवाय आम्ही ऐकत नाही, व श्रीमंताचेंही म्हणणे त्यास

* पेशवे § श्रीमत = या पत्रात सर्वत्र नाना फडणवीस.

जिवें मारावयाचा त्याजवरून राजश्री बाळाजीपंत केळकर नि॥ राघोपंत गोडबोले यास रमण्यात पाठवून, त्याची बेडी तोडवून, उंटावर उंटाचे शेपटीकडे तोड करून बाधून, कोतवाल चावडीस आणिला. आणि पांच पाट काढून, शेदूर डोकीत घालून, पुन्हा उंटावर पूर्ववत्प्रमाणे घालून आठी पेठा फिरविला, आणि गारपिरावर नेऊन सोडिला, आणि ब्राह्मणास सागितले जे, तुम्हास पाहिजे तर सोडा किवा मारा. असे सागून हवाली केला त्याजवर दोन घटका दिवसास सायंकाळच्या राहता, ब्राह्मणानी धोंडे घालून मारिला. त्यास दहन करावयाची देखील परवानगी नाही, व कोतवाल मजकूर याचा दिवाण बापूजीपंत व गोपाळपंत व केसोपंत भावे याचे घरी चौक्या बसवून बेड्या घालून ठेविले आहेत. त्याचेही पारपत्य यथास्थित चागले करणार, व प्यादे व माणसें ब्राह्मणास धरून आणावयास व कोडून ठेवावयास जे होते, त्याची पारपत्ये शिरच्छेदाची करावी, असा श्रीमंताचा मनोदय आहे पुढे काय घडेल ते पाहावे, व कोतवाल मजकूर याचे घरची जप्ती मुलामाणसासुद्धा करून चौक्या बसविल्या आहेत, व दोघा लोकास बेड्या घातल्या याप्रमाणे येथे जाहाले ते स्वामीस कळावयाकरिता लिहिले आहे सेवेसी श्रुत होय, हे विज्ञापना

६३

ऐ. टि. भा. १ ले. १३ ]                [ १ जुलै १७९२

## फ र्मा न बा डी

**[ सवाई माधवरावांच्या कारकीर्दीत महादजी सिंदे स. १७८० त हिंदुस्थानांत गेले. तिकडे पेशव्यांचें वर्चस्व स्थापून बारा वर्षांनीं ते परत पुण्यास आले. तेव्हां तेथें बादशाही फर्मानें व मानमरातब स्वीकारण्याचा मोठा दरबार ता. २२ जून १७९२ रोजीं भरला. त्यास फर्मानबाडीचा दरबार म्हणतात, त्या दरबाराचें वर्णन नाना फडणिसानें निजामाजवळचा पेशव्यांचा वकील गोविंदराव काळे यास लिहिलें. तें ऐकून काळ्यानें आपला आनंद या उत्तरांत व्यक्त केला आहे. या लेखांत एकंदर तीन पत्रें आहेत. पहिल्या पत्रांत महादजी सिंदे दिग्विजय करून पुण्यास आले त्याचें वर्णन आहे. दुसऱ्यांत फर्मानबाडीचा दरबार झाला**

**त्याचें वर्णन आहे. त्या दरबारांत गोवधबंदीचें बादशाही फर्मान वाचण्यांत आले ते समग्र फर्मान तिसऱ्या पत्रांत दिलें आहे. मराठ्यांचा मुख्य उद्देश मोगल बादशाही नष्ट करण्याचा नसून फक्त स्वधर्मस्वतंत्रता स्थापण्याचा होता हें या कागदांत व्यक्त होते. मराठशाहीचा परमोत्कर्ष या वर्णनांत व्यक्त होतो. ]**

श्री

विनंती ऐसीजेः— राजश्री पाटीलबावा जामगावास आलियावर, तुकोजी शिंदे याचे नातू दौलतराव शिंदे, वय बारा वर्षाचे, त्याचे लग्नाचा निश्चय करून, श्रीमंतास व मंडळीस अक्षत द्यावयाकरिता फडणिसास पाठविले. त्यानी श्रीमंतास व सर्व मंडळीस अक्षत दिली. सरकारातून राजश्री गोविंदराव बाजीबराबर अहेर पाठविला आम्हो आपला अहेर वेदमूर्ति राजश्री गोविंदभट याजबरोबर पाठविला. त्यासी व पाटीलबावासी निखलसतेचे बोलणे जाले. त्यात निखलसता बहुत पाहिली नंतर मागाहून राजश्री आबा* चिटणीस पुढे आले. त्यासी बोलणे होऊन, परस्परें निखालसतेचा विध† राजश्री हरिपंत तात्यासुद्धा जाला नंतर भेटीचा समारंभ जाला कोणे गोष्टीचा संशय राहिला नाही. तुम्हास कळावयाकरिता लिहिले म्हणोन आज्ञा,—

ऐसियास पत्र पाहाताच रोमाच उभे राहून अतिसंतोष जाला याचा विस्तार पत्री किती लिहूं ! सीमा असे यावरून ग्रथाचे ग्रथ मनात आले ते लिहिल्याने लहुचटपणा दिसतो दिसो, परंतु जे मनात आलें त्यातून किंचित् अमर्याद करून लिहितो. एक एक रक्कम$ मनात आणून दीर्घ दृष्टीने तोलून पाहिल्यास खरे आहे असेच निघेल ते काय ? तपशील अटक नदीचे अलीकडे दक्षिण समुद्र पावेतो हिंदूचे स्थान—तुरकस्थान§ नव्हे—हे आपली हद्द पाडवांपासोन विक्रमजित पावेतो त्यानी राखून उपभोग केला त्यामागे राज्यकर्ते नादान निघाले यवनाचे प्राबल्य जाले चकत्यानी‡ हस्तनापुरचे पद घेतले. शेवटी अलमगिराचे कारकीर्दीत यज्ञोपवितास साडेतीन रुपये जेजया बसून, ओले अन्न विकावे, सर्वांनी घ्यावे, हे नौबत गुजरली.|| त्या दिवसात कैलासवासी शिवाजी महाराज शककर्ते व धर्म राखते निघाले त्यानी किंचित् कोन्यात

* हे सिंधांचे चिटणीस, तिघे बधू आबाजी रघुनाथ, कृष्णोबा रघुनाथ व गोपाळराव रघुनाथ. † विध = विधी. $ रक्कम = गोष्ट, कलम. § तुरकस्थान=मुसलमानाचा देश ‡ चकत्यांनीं= झगताईखानाच्या नांवावरून मोगली वशास चकते असें आडनांव आहे व त्याच्या पादशाहीस 'चकत्याची पातशाही' असें म्हणतात. || नौबत गुजरली=द्वाही फिरली, डंके वाजले.

धर्मसंरक्षण केले पुढे कैलासवासी नानासाहेब, भाऊसाहेब प्रचंड प्रतापसूर्य असे जाले की, असे कधी जाले नाही अमुक ब्राह्मणानी राज्य केले असे शास्त्री पुराणीं वर्णन नाही परशुराम अवतारी काय असेल ते असो त्या गोष्टी यास शिंदे होळकर दोन बाजू होऊन प्राप्त झाल्या हल्ली श्रीमंताचे पुण्यप्रतापेकडून व राजश्री पाटीलबावाचे बुद्धि व तरवारीच्या पराक्रमेकडून सर्व घरास आले परतु जाले कसे ? प्राप्त जाले तेणेकडून सुलभता वाटली अगर मुसलमान कोणी असते, तरी मोठेमोठे तवारीखनामे— जाले असते यवनाच्या जातीत तिळाइतकी चागली गोष्ट जाल्यास गगनाबराबर करून शोभवावी, आमचे हिंदूंत गगना-इतकी झाली असता उच्चार न करावा, हे चाल आहे असो अलभ्य गोष्टी घडल्या उग्याच दौलती पुसत घरास आल्या याचें संरक्षण करणे परम कठीण ! दोस्त दुष्मन फार यवनाचे मनात की काफरशाई जाली हे बोलतात लेकिन† ज्यानी ज्यानी हिंदुस्थानात शिरे उचलली, त्याची शिरे पाटीलबावानी फोडिली कोणाच्याही मनात हे वाहडले, ते शेवटास जाऊं नये, यास्तव नाना स्वरूपे व युक्तीकडून नाश करावे ऐसे आहेत न लाभाव्या त्या गोष्टी लाभल्या त्याचा बदोबस्त शककर्त्याप्रमाणे होऊन उपभोग घ्यावे हे पुढेच आहे कोठे पुण्याईत उणें पडेल आणि काय दृष्ट लागेल न कळे जाल्या गोष्टी यात केवळ मुलख. राज्य प्राप्त, इतकेच नाही, तर वेदशास्त्ररक्षण, धर्मसंस्थापन, गोब्राह्मणप्रतिपालन, सार्वभौमत्व हातीं लागणे, कीर्ति, यश याचे नगारे वाजणे, इतक्या गोष्टी आहेत हे किमया $ साभाळणे हक्क आपला व पाटीलबावाचा ! यात वेत्यास§ पडला की दोस्त दुष्मन मवजूद ‡ सशय दूर जाले, हे अति चागलें ! अति चागले ! याउपरी हे जमाव व या फौजा लाहोरच्या मैदानात असाव्या, याचे मनसबे दौडावे वेत्यास पडावे, तमाशे पाहावे, असे जन जे आहेत ते उशा पायथ्यास लागून आहेत चैन नव्हते. आता आपण लिहिल्यावरून स्वस्थ जाले जितके लिहिलें इतक्याचें उगेंच मनन व्हावें. खरे की लटके हे समजावे. रवाना छ ११ जिल्काद हे विनंति

---

— तवारीखनामे = बखरी, इतिहास. ' काफरशाई = मराठ्याच्या हिंदुपदशाहीस मुसलमानानीं दिलेलें निंदाव्यजक नाव. † लेकिन = परतु. $ किमया = अद्‌भुत कृति. सामर्थ्य. § वेत्यास = व्यत्यास = विरुद्धता, व्यत्यय, अतर. ‡ मवजूद = भांडण्यास तयार, विरुद्ध बाजूस सिद्ध, हजर.

६४

इ. सं. ऐ. टि. भा. १ ले. ९ ] [ २ जुलै १७९२

# फर्मानबाडीचा दरबार

विनंती ऐसीजे

राजश्री पाटीलबावा जाबगावीहून निघोन ज्येष्ठ वाा अष्टमीस पुण्यानजीक खडकीच्या पुलावर येऊन मुक्काम केला नवमीसह दशमी सायंकाळचे पाच घटका दिवस राहता, श्रीमंताचे दर्शन घ्यावयाचा मुहूर्त निश्चयात आला इकडून श्रीमंत गणेशखिंडीपावेतो सामोरे गेले तिकडून पाटीलबावा आपले बराबरील सरदार घेऊन आले इकडील मुत्सद्दी मंडळी व सरदार मंडळीच्या व त्याच्या भेटी झाल्या नतर पाटीलबावा येऊन श्रीमंताचे पायावर डोई ठेऊन भेटले. श्रीमंतानी आपले गळयातील मोत्याची माळ पाटीलबावाचे गळयात घातली येणेप्रमाणे समारंभाने भेट बहुत चागली झाली यापूर्वी भेट झाल्याचे सरासरी लिहिले, तपशील समजावा सबब हल्ली लिहिले असे म्हणोन आज्ञा,—

त्यास श्रीमंताचे ताले. विचित्र की, असे बराबरीचे सरदार दिग्विजयी होऊन येऊन पायावर डोई ठेवून भेटतात याच्या आखबारा रुमशामपावेतो § भिरवतात या पुण्याईस जोडा नाही वर्णन करावे याचा संतोष मोठा झाला. येथील मंडळीत आम्हास सागावयास अति तेज बंदेगान अली † व मध्यस्थास सागितले त्यासही खुषी झाली जसे व्हावे तसे झाले. उचित ते घडले आम्हां येथे पुसावयाचे स्थळ म्हणोन उमदे लहान थोर वर्तमान पुसतात सागितले पाहिजे यास्तव पुढे होईल त्याची वरचेवर लिहिण्यास आज्ञा होत जावी. रवाना चद्र ११ जिल्काद हे विनंती

श्री.

विनंती ऐसीजेः—' बादशाहाकडून वकील-मुतलकी व अमीर-उल-उमराव म्हणजे मीरबक्षीगिरी याचा बहुमान आणिला आहे तो घेण्याविषयी राजश्री पाटिलबावांनी विनंति केली. त्यावरून घ्यावयाचा निश्चय झाला. डेरा देऊन

' ग्रह. § पूर्व रोमन बादशाही=इस्तबूल व पश्चिम आशिया. † हैद्राबादकर निजाम अली.

फर्मानबाडी * करून, आषाढ शुद्ध तृतीया शुक्रवारी तिसरे प्रहरी श्रीमंतांची स्वारी डेरा दाखल झाली प्रथम पातशाही फर्मान मस्तकी वंदून मुनशीजवळ दिला त्यानी भरदरबारात वाचला सर्वांनी श्रवण केला त्यात गुलाम कादर यानें बेअदबी केली त्याचें पारिपत्य, बादशाही नोकर बहुत होते, परंतु कोणी केले नाही श्रीमंताचे सरदार माहादजीराव शिंदे यानी करून बंदोबस्त केला. याजकरितां हें पद पुस्तदरपुस्त× दिले असे येविषयी फार विस्तारे लिहिले ते सर्वांनी ऐकिल्यावर वकीलमुतलकी व अमीर उलउमराची खिलत$ चारकुबा व जिगा, शिरपेच व परिंदा, कलगीमय लटकण व माळा मरवारीद व कलमदान, ढालतरवार व मोरचेल, नालखी, पालखी झालरदार, शिक्के कटार, व माहीमरातब,‡ तमनतोग घोडा समेत बहुत आदरे करून घेतली श्रीमंतानी एकशे एक मोहोर पादशाहास नजर ठेविली. पाटीलबावानी श्रीमंतास एकावन्न मोहोरा नजर डेऱ्यातच केली तोफा व गाडद्याच्या सिलका ( सलाम्या ) झाल्या, त्याजवर सरकार वाड्यात येऊन सर्वांनी नजरा केल्या राजश्री कल्याणराव कवडे व बाबाराव व कृष्णाजी देवाजी व आनंदराव रघोतमराव याजकडील यानी नजरा केल्या, व सर्वांनी आदाब बजाविली समारभ चागला झाला. तुम्हास कळावयाकरिता लिहिणें म्हणोन आज्ञा ' ऐशिवाय पत्रे पाहून अति संतोष झाला. आनंद कोठे माईना. पत्री विस्तार किती ल्याहावा ? श्रीमंत वैभवशाली विचित्र पुण्याई. कधी झाल्या नाहीत त्या रकमा चालून आल्या. श्री मुबारक करो; व याहून पदव्या अधिक प्राप्त होतील, फर्माना येतील गुलाम कादराचे पारपत्य कोणाच्याने झाले नाही, ते राजश्री माधवराव शिंदे यानी केलें. हे रकम आम्ही येथे बोलण्यात आणिली नाही वाईट वाटावयाची कारणें ! पाटीलबावानी एकावन्न मोहोरा नजर करून आदाब बजाविली. येणे करून एकनिष्ठपणाचे त्याचे महात्म दिगंतरास गेलें खानदानास उचित तें त्यानी केले आपण व पाटीलबावानी आदाब बजावली, मग राजश्री कल्याणराव व बाबाराव व कृष्णाजी देवाजी याचा गुता काय ? मार्ग पदाच्या स्वरूपाप्रमाणे घातला. इतके न होतें तर तितकेच उणे दिसते. पृथ्वीपति व इतर यवन व मराठे राजे यास आदाब कराव्या, त्यापरीस हे ब्राह्मण प्रभु, सहस्र वांटे प्रशस्त. पदास

* फर्मानबाडी=दरबार डेरा, वस्त्रें स्वीकारण्यासाठीं मोठ्या तबूत भरविलेला दरबार.
× वंशपरपरा ( पुस्त=पिढी; पिढीमागून पिढी ) $ पोषाख. ‡ मत्स्य व सोन्याचे दोन गोल यांचे मिळून होणारें हत्तीवरून मिरवावयाचें चिन्ह.

आदाब बजवावी लागती. ठीक झालें. हाच मार्ग शेवटपर्यंत चालावा. आपले व पाटीलबावाचे कारकीर्दींत ह्या गोष्टी भारी झाल्या. कीर्तीचे ध्वज झाले हे आपल्यास व पाटीलबावास मुबारक असो. रवाना चंद्र २२ जिल्काद हे विनंती.

---

मु. रि० भा. २ पृ. ४३२ ] [ ४ सेप्टें १७८९

## बादशाही फर्मान

समस्त राज्य प्रबंध खिलाफतचे कार्यकर्ते, तसेच बादशहाच्या कृपेस पात्र असे अमीर व परगणा निहायचे शासक आणि प्रातोप्रातीचे कारभारी व जबाबदार अधिकारी या सर्वांस कळविण्यात येतें की, —

बादशहाच्या कारभारात व मालिकगिरीत स्वामीची आज्ञा म्हणून या मुबारिक फर्मानाचे पालन अवश्य करण्यात यावे, आणि सर्वांनी स्पष्ट ध्यानात बाळगावें की पशुसुद्धा विधात्याच्या सृष्टीतले जीव असून ते निरुपयोगी होत असे समजूं नये. त्यातही विशेषतः बैल व गाय हे प्राणी अगणित लाभ देणारे आहेत. कारण मनुष्य व पशु या दोघांचेही जीवन धान्याच्या पैदासीवर अवलंबून असून गाय व बैल याच्या शिवाय शेतीचे काम बिलकूल साध्य होणार नाही, आणि मेहनतीस तर बैलाचे साह्य अवश्य पाहिजे यास्तव जनतेचा संसार व निर्वाह चालण्यास गाईची अत्यंत जरूर आहे आणि गाईवरच मनुष्याचे व पशूंचे जीवन अवलंबून आहे.

यास्तव आमचे प्रिय पुत्र महाराजाधिराज माधवराव सिंधिया बहादुर यानी आमचेकडे विनंती केली, त्यावरून आम्ही आपल्या उदार अंत:करणाने व हर्षपूर्ण दृष्टीनें आमच्या समस्त राज्यभूमीमध्यें गोकुशाचा म्हणजे गोहत्येचा परिपाठ सर्वथैव मना करीत आहो. या आमच्या फर्मानाचा अंमल इतउत्तर राज्यातील समस्त अधिकाऱ्यानी सावधगिरीने प्रयत्नपूर्वक करून ही आज्ञा पाळीत जावी की, जेणेंकरून कोणते नगर, कसबा, गाव यात गोहत्येचे नाव सुद्धा दिसूं नये. इतक्या उपर जर कोणी इसम या आज्ञेच्या विरुद्ध वागून गोवधाच्या पापात लिप्त होईल तर तो बादशहाच्या कोपास पात्र होऊन दंड पावेल.

छ १३ जिल्हेज

---

६५

इ. सं. ऐ. टि. भा. १ ले. १७] [२० जून १७९४

# हरिपंत फडक्यांचा मृत्यु

[ पुढील तीन पत्रांत हरिपंत तात्यांची सार्वत्रिक मान्यता व्यक्त होते. ]

## १ हरिपंतांच्या पुत्रांचें नाना फडणिसांस पत्र

स्वामीचे सेवेसी चितामण हरि व रामचंद्र हरि व लक्ष्मण हरि कृतानेक विज्ञापना तागाईत चंद्र २३ जिल्काद रविवार, अवशीची चार घटका रात्र, पावेतो वर्तमान यथास्थित असे विशेष,—स्वामीनी चंद्र २२ मिनहूचे आज्ञापत्र पाठविले ते पावले वडिलाही कैलासवास केला, हे ऐकोन फार वाईट वाटले त्याचा ऋणानुबध होता तो काय ल्याहावा? ईश्वरी इच्छेस उपाय नाही तुम्ही श्रमी होऊं नये ज्या गोष्टी ज्या काळी ईश्वरे नेमिल्या, त्या चुकत नाहीत श्रम केले असता साध्य नाही विवेक करून चित्ताचे शातवन करावे म्हणोन आज्ञा, त्यास–ईश्वराचे नियमाप्रमाणे जी गोष्ट व्हावयाची ती कालपरत्वें होतच आहे परंतु वियोगजन्य दुःख होते, ते काय विनंती ल्याहावी? हल्ली स्वामीचे आज्ञापत्र आले हे पाहाताच, वडिलाचे पत्राप्रमाणे असेच मनास वाटून श्रम दूर जाला आज्ञेप्रमाणे विवेक करिता वडिलाचा (व) स्वामीचा ऋणानुबध होता तो स्वामीचे चित्तास ठाऊक दुसरा काय जाणे? म्हणोन स्वामीस खेद बहुत होतो ऋणानुबंध लिहून कळवावा असे नाही आता वडिलाचे ठायी स्वामी, तेव्हां स्वामी श्रम करू लागले, तर विवेकाची विनंती कोणी करावी? आम्ही लेकरे, स्वामी वडील विवेक करून साभाळ करणे स्वामीकडे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

## २ मोरेश्वर हरीचें नानास पत्र

स्वामीचे सेवसी विज्ञापना—स्वामीनी चंद्र २२ जिल्कादचें आज्ञापत्र पाठविले ते पावले त्यात वडील कैलासवासी जाले; मरणापूर्वी दोन घटका माझे नाव घेऊन स्मरण केले, त्यावरून फार श्रम चित्तास वाटले, ते ईश्वर जाणे. त्याचा ऋणानुबंध माझे मनास ठऊक. याचे उत्तर ल्याहावयास लेखणी चालेना होणार चुकत नाही विवेक करावा म्हणोन आज्ञा त्यास—स्वामीनी

आज्ञा केली ते प्रमाण तसाच ऋणानुबंध स्वामीचा त्याचा होता तेव्हां लेखणी कशी चालेल ? विवेक करण्याविषयी आज्ञा त्यास वडिलाचे ठायी आता स्वामी आज्ञापत्र आले हे वडिलाचे असेच मनास वाटले सर्व प्रकारे स्वामी आहेत. आम्हास काळजी काय आहे ? आज्ञेप्रमाणे विवेक करितो सर्व भार स्वामीवर, स्वामीनी चित्ताचे शातवन करावे अशी विनंती कोणी करावी ? स्वामी सर्वज्ञ आहेत. विवेक मनास करून साभाळ करणे हे स्वामीकडे आहे विशेष विनती काय लिहूं ? रवाना रविवार चार घटका रात्र अवशीची सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

## ३ नागपूरकर भोसल्यांचें पुण्यास पत्र

९ जुलै १७९४

पुरवणी राजश्री कृष्णराव माधव गोसावी यास. उपरी—हरिपंत तात्याचे शरीर दिवसे दिवस कृश होऊन, शेवट ज्येष्ठ वद्य सप्तमी रोज गुरुवार देवाज्ञा जाली म्हणोन लिहिले ते कळले त्यास–हे वर्तमान ऐकून बहुत वाईट वाटले, अनुचित गोष्ट जाली फाराचे उपयोगी ते मनुष्य होते येथील तो अभिमान व बाणेकरी त्याजवर होती दुसरे, राजश्री बाळाजीपंत नाना याचे जातीस, सगळा विसावा त्याचा किती होता, तो शोच व खंती अंतःकरणीची, येथील तेथील पत्री लिहवत नाही ईश्वरसत्ता प्रमाण ऐशा प्रकारास कोणाचा उपाय नाही हे सर्व एकीकडेस ठेवून जे प्राप्त ते करावे लागते त्यास उणी गोष्ट दिसल्यास लौकिकाविरुद्ध याच्या चाली येथून विचारवतास व सर्वज्ञतेस ल्याहाव्या ऐसे नाही जेव्हा तात्याचे दुखणे बारा चौदा महिने एक सतत लावले, चालही दुखण्याची या वेळेस अधिकोत्तर दिसो लागली, तेव्हा पुढील दुरंदेशीचा विचार आज आठ महिन्यापासून चित्तात आणून, याविपयीचा लेख तुम्हास लिहिण्यात आला होता तोच दिवस येत येत या तऱ्हेचा आला त्यापक्षी जे दौलतेस उचित ते करणारानी करावेच आपल्या साहाय्यास सोडूं नये जहाला प्रकार तो पाठीमागे टाकावा यावेगळी दुसरी उत्तम सलाह नाही आता मदार राजश्री बाळाजीपंत नाना याचे जातीवर आहे. त्यानी आपले अंगी सारे अर्थ आणून व पाहून अधिक सतेजता आणावी. त्यास सर्वस्वे अनुकूल असे एक वेळ केल्यावाचून दौलतीचे चालीचे कर्तव्यास चागले पडावयाचे नाही एवढी कृति करण्यास सहसा योग्य मनुष्य

असावे हे मनात कदाचित् आणितील, तरी जे गोष्ट उपयोगाची मनी धरून, खचितपणेचे विचार, एकवाक्यतेचे बाणेकरी यासी सर्व प्रकारे अनुसरून, अनुकूलतेचे अर्थास असो हे पूर्वी बळकटपणाचे विचार कुल जाणवणीचे लिहिण्यात आले होते तेच हल्लीचे लिहिणें समजोन त्यात दुसरे हरगीज होतच नाही इकडील खमीर याच दिवसाचे परीक्षेचा समजावा कोणत्याहि प्रकरणी उणे राजश्री बाळाजीपंत नाना यानी दिसों दिले नाही हेच श्रीजी घडवील तेथें एकपक्षीच लिहिणे हेच न समजावे राजश्री पंतप्रधान दैवशाली पुरुष व राजश्री बाळाजीपंत नाना कृतकर्मे आहेत ज्यात सर्व कामे सतेजतेने स्वराज्याची सिद्धीस जातील ऐसेच होईल त्याचे साहसाचा अर्थ कोणताही कमी पडावयाचा नाही याची काय फिकीर आहे? हें मुख्य तात्पर्य साऱ्या प्रकरणीचे चालीचे लिहिलें आहे व जो आठा महिन्याचा लेख तुम्हास लिहिण्यात आला आहे, तोच बहुधा ऐशा प्रसंगास तुम्ही नेटाचा दाखविला असेल, अथवा आता दाखवावा यातच बाणेकर याचे साहसासाठी येथील विचार मनापासून कैसा ठेविला ते प्रत्ययास यावे व येईल, तेथे दुबारा तपशील वारवार ल्याहावा लागत नाही त्याचा मात्र साराश शिरोभाग हल्ली हा लिहिला आहे. हे पत्रच तुम्ही एकाती जाऊन राजश्री बाळाजीपंत नाना यासी दाखवावे आणि हेंच बोलण्यात आणणें की, यास पूर्वील व हल्लीचे लिहिल्या अन्वयी, येथील खमीराविषयी बेफिकीर राहावे, अंदेशा करू नये, खमीरात उणे पडूं देऊ नये, सेनासाहेबसुभा राजश्री बाळाजीपंत नाना याजवळच आहे, ऐसे जाणावे या पत्राचे उत्तर समर्पक सत्वर पाठवावे. या दिवसात तुम्हीं तेथे राहून राजश्री बाबूराव विश्वनाथ व श्रीधर लक्ष्मण या उभयताचे येणे होत आहे हे नीट आहे भवति न भवति हे बोलणे इति कर्तव्यतेचे तेथे पडेल येथूनही लिहिणे घडेल याची सोय फार चागली जाली उभयताचे निघणे होऊन दरमजलीने पोहोचतील. एकातीचे विचार बोलतील वरकड ज्या प्रसगास जे उचित, ते निःसंशय इकडून घडण्यास कसूर व्हावयाचा नाही. याची खातरजमाच बोलून करावी जाणिजे चद्र ११ माहे जिल्हेज. सदरहू लिहिल्या अर्थाचे मनन करून राजश्री बाळाजीपंत नाना यासी बोलण्यात आणावे खातरजमा करावी. याचे उत्तर सत्वर यावे बहुत काय लिहिणें?

---

६६

ऐ. प. ले. ३०३ ] [ २९ मार्च १७९४

# आनंदीबाईचा मृत्यु

**[ रघुनाथरावाची बायको आनंदीबाई हिच्या मृत्यूचें खालील पत्र आनंदवल्लीहून नाना फडणीसास त्याच्या कारकुनाने लिहिलें आहे ]**

सेवेसी कृष्णाजी जनार्दन कृतानेक शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २६ साबान पावेतो मुक्काम आनंदवल्ली येथे असे. विशेष. श्रीमंत मातुःश्री आनंदीबाई यास दुखणे झाले आहे फार प्रकृति कठीण आहे छ २३ रोजी सायंकाळी घाबरी झाली नेत्रास तटस्थता झाली, म्हणोन दर्भास्तरणावर आली नंतर गंगोदक मुखात घातले घटका अर्ध घटकानी किंचित् सावध झाली कंठामध्ये कफाची दाटणी झाली होती म्हणोन हेमगर्भ मात्रा घातली तेणेकरून स्थिर झाली संपूर्ण रात्रीमध्ये जवळ बाजीराव व अमृतराव व चिमाजी आपा ऐसे बसले होते उत्क्रान्त धेनु सायंकाळीच दिल्ही नंतर सारी रात्र दर्भावर होती प्रातःकाळीच सूर्योदयाचे संधीस प्राणोत्क्रमण झाले एकादशी व गुरुवार दिवस प्रातःकाळ काल झाला प्राणोत्क्रमणापर्यंत सावध होती डोळे पुसणे किंवा अंग खाजवणे किंवा पदर नीट करणे व पाणी पाहिजे तर सांगणे हे सर्व आपले हाते करीत दोन दिवस कफ गळ्यात झाला आणि शक्तिहीन झाली, त्यामुळे शब्द बोलणे राहिले मरणकाळी पोटात प्यांहा रोग होईल असे त्याचे पत्रिकेत होते. तीही सांगत होती तोच रोग झाला तेणें करून व्यात झाली पहिला देवपूजन व जप करणे याचा अभ्यास फार होता मरणकाळपर्यंत देवपूजन व नमस्कार करणें, मागती मागती न्यास करावे असा छंद लागला होता प्रातःकालापासून साहित्य होत होते. अग्निहोत्र प्रकरण पहिले झालेलें त्यामुळें ते उपचार झाले. अग्निमथन करून काढला आणि तोच विधि सर्व झाला त्यामुळे गंगेवर जाण्यास बारा घटका दिवस आला. बाजीराव क्रिया करतात. मागती सर्व वाड्यात येत तोपर्यंत अडीच प्रहर दिवस झाला.

सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

६७

राज० खं. १० ले० ३८७ ] [ २५ जाने १७९५

# मी आपली धर्माची बहीण

**[ बडोद्याचे फतेसिंगराव गायकवाड यांची विवाहित स्त्री अहिल्याबाई इची नवऱ्याचे पश्चात् हैराणगत कशी झाली आणि त्या काळीं अशा अनेक स्त्रियांची आबाळ कशी होत असे त्याचें चित्र पुढील पत्रांत पहावयास मिळतें. ]**

राजश्री दवलतराव बाबा शिंदे गोसावी यासी,—

अखंडित–लक्ष्मी-अलंकृत राजमान्य,

गंगाभागीरथी अहिल्याबाई गाइकवाड मु॥ देवळाली प्रां नाशिक विनति विज्ञापना येथील कुशल ता। माघ शुद्ध ५ पावेतो आपले कृपाअवलोकने करून यथास्थित असो विशेष

आमचे वर्तमान आमचे धणी§ कैलासवासी जालेनंतर मानाजीराव गायकवाड यानी पचवीस तीस लक्षाचे वित्ते* घरात होतें ते दरोबस्त लुटून नेले. आम्हास एक वस्त्रानिसी एक घर लहानसें होतें तेथेच टाकून ठेविले, आण मानाजीराव देवलोकास गेले तदनंतर गोविंदराव गायकवाड आले त्यानी येताच प्रथम आमची खायाखर्चाची नेमणूक दाहा हजाराची होती ते बंद केली, आण घरास खणते लाऊन एक लक्षाचे वित्ते नेले मग तेथे आमचे चुलते नारोजी देशमुख होते त्याजपाशी आम्ही डागिने चवलक्षाचे ठेविले, आण आम्ही श्रीमार्तंडाचे दर्शनास जेजुरीकडे निघालो आमचे मागे देशमुख मजकूर याणी गोविंदराव बावास सागून डागिने चवलक्षाचे त्यास दिल्हे, आण आपण मामलत करून गेले आम्ही ये प्राती आलो तेव्हा आम्हास वारीस एक श्रीमार्तंड किंवा आपण आहेत यास्तव विनति लिहिली आहे तर, आमचा बंदोबस्त करून देविला पाहिजे आम्ही भेटीस यावे, तर येथे आम्हास खर्चाची आवळ आहे, यास्तव हे पत्र लिहिले

आपण गोविंदराव बावास ल्याहावे आमचे धण्याचे हातची नेमणूक आहे ते आम्हास देवावी व हाली रावबा† पुणे प्राती येणार आहेत, त्याजलाही

§ फतेसिंगराव गायकवाड मृ० ९ जाने० १७९० *वित्त † गोविंदराव गायकवाडाचा कारभारी रावजी आपाजी.

ताकीद करावी दुसरे, नारोजी देशमुख याचे साठ गाव आहेत, त्यातून तीस गावावर आपण जती पाठऊन, आपण आम्हास हात उचलून खायाखर्चास द्याल, त्यात आम्ही राजी आहो आपण बहुताचे पालन केले तैसे आमचे केले पाहिजे विनतिपत्र लिहिले आहे हे उदास न करावी

दुसरे आमचे धण्यास एकशे साठ बायका होत्या त्यात चौघी खाशा. गोविदराव गायकवाड याणी बायका दरोबस्त काढून दिल्या आणि आमची चौघीची हे गत केली हे वर्तमान सेवेसी विनंति लिहिली आहे. तर आमचा बदोबस्त करून दिल्हा पाहिजे आमचे धण्यानी कोट्यानकोट पैका असोन, त्याचे देऊळ कोणे बाधले नाही, हे आपल्यास श्रुत होये आपण पाटीलसाहेबाचे पोटी कुलदीप आहेत मी धर्माची बहीण जाणोन हे कार्य केले पाहिजे आण हे न जाल्यास आपले पायापाशी बोलाऊन घ्यावे आपण शेर पीठ द्याल तर खाऊन बसूं यादो भास्कर याणी सर्व बंदोबस्त करून घरोघर लाविले दमाजी बावाचे हातचे दोनचार गाव पाटिलकीचे आहेत, त्यात सर्वपरी काल याचा आहे आमचे कोठे चालूं देत नाहीत. आम्हास पत्रे आणून दाखवितात की, आम्हास धण्यानी सागितले. मग खरे किवा खोटे न कळे. त्याजमागे मानाजी बावाचे वेळेस वाण्यानी उपसर्ग दिल्हा त्याजमागे आता तर परभूमयच जाले सर्व कारभार सोडून बायकास लुटितात सेवेसी श्रुत होय हेतूप्रमाणे भरंवसा जाणून, हे पत्र कोणास न दाखवणे आण उत्तर पाठविले पाहिजे बहुत काय लिहिणे हे विज्ञापना

६८

राज० खं १७ ले २ ] [ ३ सेप्टे १७९६

## मावळांतील न्याय

**[ मावळांत शिवाजीनें राज्यव्यवस्थेचा पहिला उपक्रम सुरू केला. त्यांत पूर्वी कशी अंदाधुंदी माजली होती आणि दादाजी कोंडदेवानें न्याय निवाडा कसा चालू केला, तें खालील उताऱ्यांत दिसून येतें. एका मोठ्या कागदांतील लहानसाच उतारा येथें स्वीकारला आहे. ]**

करीणा § सुभानराव बिन खंडेराव सिदे सिलिमकर देशमुख तर्फ मात्रळ सुरुसन सब्वा तिसैन मया व आलफ करीणाा लेहून दिला ऐसाजे—...... × × × ×

त्यावरी महिना पंधरा दिवस जाहलेयावरी सिलिमकर याणी येऊन गुंजवणियास जाऊन पुनाजीस व उभयताच्या बाइकास व मुलास मारामार करून कापून घर लुटून कागद वतनाचे होते ते नेले, आणि घर खाणून जाळिले तो सवेच मलिकअबर विजापुराहून पुणियास आले त्याजकडे हे त्रिवर्ग सिलीमकर जाऊन त्यास आपले तऱ्हेने समजाऊन निमे देशमुखी करून घेतली त्याजवरी काही एक दिवसी भिवजी आमचा वडील बेदराहून थोरले सुपेयास आला तो इकडील वर्तमान पुनाजीचे आवघेच कळले मग भिवजीने द्वितीय संबंध केला त्यास पुत्र दोघे फुलाजी व बाजी ऐसे जाले आपले मुलाकतीस आले. तो भिवजी माा तेथेच वारला.

मग दादाजी कोडदेव याचे कारकिर्दीस फुलाजी व बाजी मौजे मिडमावणे निमे ताा माा येथे उतरले तो सिलीमकर अवघे पळोन गेले त्यावरी फुलाजी नाईक याणे दादाजी पंताकडे जाऊन आपले अवघे वर्तमान विदित केले जे, सिलीमकर याणी माझे वडिलाचा मारा करून माझे वेतन घेतले आहे, ते त्यापासून देविले पाहिजे तेव्हा दादाजी पंतानी सिलीमकर यास बोलावून आणून चौकशी केली माहालो माहालच्या साक्षी पाहिल्या तो सगळेच वतन हे खरे तेव्हा दादाजीपंतानी फुलाजीस विचारले जे, सिलीमकर व तुम्ही ऐसे निमे निमे वतन खाणे तुमच्या वाटणी करून देतो.

तेव्हा फुलाजी म्हणाला की त्यास सुईच्या आग्रावरील मृतिका देत नाही तेव्हां दादाजीपतानी मध्यस्त घालून फुलाजीस कित्येक प्रकारचे सागितले, परंतु फुलाजी ऐकेना. तेव्हा फुलाजीने दादाजीपंताचे न ऐकता माघारा का॥ केतकवणियास आला उपरातिक सिलीमकर याणी दादाजीपतास गैरवाका समजाऊन लाच दिल्हा त्यावरून दादाजीपंती सिलीमकर याचे आगत्य धरून फुलाजीस नेऊन बासाचा मार देऊन जिवे मारले त्याचे प्रेत माघारे घरास हेमाजी दिघा व कालोजी फदाम घेऊन आले तो त्याचा भाऊ बाजी याने फुलाजीचे प्रेत पाहून आपणही आपली जीभ आसडून तोही मेला. मग दोघाचे

सार्थक सेजारीच करून बाजीचा पुत्र आबाजी चौ महिन्याचा होता, तेव्हा फुलाजीचा खानाजाद तुलाजी व मडाजी ऐसे होते. त्यानी आबाजीस पळवून ता॥ मोसेखोरे येथे मौजे वरसगावास गेले मागे दादाजीपती सिलीमकराचा पक्ष धरून आम्ही हाजीर नसता सिलीमकर याणी सागितले त्याप्रमाणे पत्रे करून दिली, आणि वतन जबरदस्तीने खाऊं लागले

## ६९

**ऐ. टि. भा. १ ले. ४.**] [३१ डिसे १७९६

# नाना—बाजीरावांमधील करार

**ता. २७ ऑक्टो १७९५ रोजीं सवाई माधवराव पेशवे मृत्यु पावल्यावर नाना फडणिसांनीं चिमणाजी आपास यशोदाबाईंचे मांडीवर दत्तक देऊन ता. २५ मे १७९६ रोजीं पेशवा केले तो प्रयत्न फसल्यामुळें नानानें बाजीरावास ता ५ डिसेंबर स. १७९६ रोजीं पेशवे पदावर स्थापून कारभार चालविला. उभयतां मध्यें दिलसफाई नव्हती, सबब त्यांनीं एकमेकांशीं विचार करून एक करार ठरविला, तो खालील सहा कलमात दाखल आहे.**]

श्री

यादी दौलतीचे बंदोबस्ताची कलमे सन सबा सितैन मया व अलफ

१ दौलतेतील लहान मोठी कामे व देणी घेणी व खर्च सरदाऱ्या, मामलती, कोट किल्ले वगैरेच्या चालीची वहिवाट पूर्व सांप्रदायानुरूप होत असावी, व पहिली कामे काजे केली व उपयोगी पडले, सबब जे ज्याकडे आहे त्या प्रमाणे चालावे. दौलतेतील जमा काय व खर्च किती याचे मनन होऊन, समजोन समय पाहून, धाग चालावा 'देवावे' 'द्यावे' 'देणे' झाल्याखेरीज कोणताही कारभार होऊं नये ज्याचें काम त्यानी करावें कैलासवासी नानासाहेब व रावसाहेब पण आगी आणून, त्या दृष्टीने दौलतेतील लहान मोठ्याकडे पाहून ज्याचे त्यापरी योग्येतनुरूप लोभाने चालावे, येणे प्रमाणे करार

२ सांप्रदायाशिवाय जास्त खर्च व खाजगत खर्च निराळा असें होऊं नये. अगर मर्जी असल्यास हल्लीच खाजगीचे खर्चाचा नेम करून सांगावा वरकड

दौलत प्रकर्णी पूर्वचालीप्रमाणे घडावें मागील सावकारी कर्जे व लोकाची देणी वगैरे सोयीनें तोडी होत असाव्या खाजगत खर्चाची याद शिवाय करून बाकी लिहिल्याप्रमाणे करार.

३ सरदार व शिलेदार व पागे वगैरे यास बोलावण्याची आज्ञा होत असावी. त्यानी दरबारास यावे बोलावण्याखेरीज जाजती हाजुमा[१] अरो नये. चौकीस लोक वगैरे सर्व पूर्वसाप्रदायाप्रमाणे कदीम विश्वासु असावे दरबारचे वेळेस सर्वांनी यावे इतर येणे ते बलावण्याशिवाय येऊ नये आमचे विश्वासू चौकीस राहातील येणे प्रमाणे करार

४ हल्ली कोणी कामकाजावर पडले असतील त्यास देणे व वाढवणे, त्याची याद हल्लीच समजोन व्हावी. म्हणजे हल्लीचे वहिवाटीची रक्कम उगवली हल्ली कामकाजाचे उपयोगी पडले आहेत त्याचा उपयोग पाहून सर्फराज केले जातील. येणे प्रमाणे करार

५ कोणतेही गोष्टीचा संशय घेऊं नये, कोणी सागितल्यास ऐकूं नये. कदाचित् मनात आल्यास वेगळे वाटेने बोलून निराकरण होत असावे घरातील गोष्ट बाहेर जाऊं नये गेल्याने दौलतीचे कामात व दाबात कमी पडून उपहास होतो खावंदाचे दाबावर दौलतीचे काम करावे लागते यास्तव कोणतेही कामास आतून फूस व गुढगा नसावा. येणेकडून कारभारी याचा दाब राहात नाहीं सरकार कामास उणे पडते. हरएक कामाची भवति न भवति माहितगारीसाठीं करावी परंतु शेवटी कारभारी समजोन विनंती करितील ती मान्य होत असावी. ओढ पडूं नये, व खास दस्तूर कोणास लिहूं नये हे रक्कम राखली असता मोठे कामावर समयास उपयोगी पडावयाची त्यास जपणें असावे शिक्कामोर्तब कारभारी यास कळल्याशिवाय होऊं नये. दौलतीची माहितगारी नाही समक्ष येऊन हरएक कामाची माहितगारी होत असावी येणे प्रमाणे करार

६ हरकोणावर कारणानुरूप रोष व कृपा करणे त्याचा विचार आधीं कारभारी याशीं होऊन ठरेल तसे होत असावे राजकारण व कागदपत्र व निरोप परभारें कोणास जाऊं नये लौकिकात फूट दिसते हलक्या माणसाचा सहवास नसावा. येणेंकडून मनात विपर्यास येणार नाही योग्यता पाहून ज्यासी

---

[१] गर्दी, घोळका.

जितके काम तितकेच बोलावे. कोणतेही कामाची जलदी नसावी समजोन उमजोन होत असावें गैरवाका होऊं नये. येणे प्रमाणे करार

कलमे सुमार साहा सदरहू प्रमाणे धन्यानी व कारभारी यानी वैवाट करावी येणेकडून दौलतीचा दाब व बंदोबस्त राहून काम चागले चालेल. येणेप्रमाणे करार छ १ रजब पौष मास सु॥ सबा सितैन

---

७०

ऐ. ले. सं. भा. १२ ले. ५३२८ ] [ १३ मार्च १८००

# नाना फडणिसाचा मृत्यु

[ पुण्याहून पटवर्धनांचें मिरजेस पत्र ]

विज्ञापना ऐशी जे—

श्री॥ नाना याचा काळ व॥ ३ गुरुवारी मध्यरात्रीस जाला. समस्त मुत्सद्दी आले होते प्राणोत्क्रमण समयीं श्री॥ राजश्री ( अमृत ) रावसाहेब हेही आले परंतु भाषण नाही तसेच वाड्यात गेले. शव माजघरांतून जाळीपुढे आणिले. गंगेवर न्यावयाची सिद्धता जाली, तो आरबानी आपले फडशाकरिता अडथळा घातला. नतर राजश्री दुल्लभदास यानी हवाला घेतला, तेव्हा शव बाहेर जाऊं दिले. या खटपटीस सूर्योदय जाला नदीवर दहा सहस्र माणूस मिळाले होते. नानाकरिता शहरात ते दिवशी हाहाकार जाला तो काय वर्णावा ? मातोश्री बाया सिद्धटेकास होत्या, त्यास भृगुवासरीं प्रहर रात्रीस वर्तमान समजले. नंतर निघाल्या सायंकाळचे श्री॥ राजश्री रावसाहेब व बाबा फडके, चक्रदेव वगैरे झाडून समाचारास्तव आले होते स्वामीस कळावे सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

७१

म. रि. म. वि. १ पृ. ७३ ] [ डिसे १७१६

## अतुल पराक्रमी सेवक

**[ बाळाजी विश्वनाथाची योग्यता शाहू महाराज केवढी मानीत होते हें पुढील पत्रांत व्यक्त होते. बाळाजीपंत नाना बाहेर स्वारींत असतां सन १७१६ त चंद्रसेन जाधव व मुहकमसिंग यानीं महाराजांवर कठिण प्रसंग आणिला, त्या वेळीं त्यांनीं हे पत्र लगबगीनें लिहिलेले आहे. ही गोष्ट पे. द. भा ३० पृ. २३६ वरील, २१ मोहरम सन सबा अशरच्या उल्लेखावरून स्पष्ट होते. कालानुक्रमाने हे पत्र वर ले १६ च्या पुढे वाचावें ]**

रा रा बाळाजी पडित प्रधान यास आज्ञा केली ऐसीजे

अलीकडे तुमचे विनतीपत्र येत नाही साप्रत तुम्ही कोठे आम्हा काय मनसुबा-करिता ते कळले नाहीं. या प्राती करवीरकरानी निजामुल्मुल्काचे साह्य करून घेऊन दंगा करण्याचा विचार केला हे वर्तमान विस्तारे तुम्हास कळावे याजकरिता पत्रे लिहिली सादर जालीच असतील. नबाबाचा अदूरपणाचा प्रकार व करवीरकराची कोती अंदेशी हे दोन अर्थ एकत्र झाले आहेत याचा परिणाम कळलाच आहे तथापि तुम्ही दूर देशी असता मनसुबा प्राप्त जाला याची तोड तुम्हास कळेल त्या रीतीने करालच. तुम्हासारखे अतुल पराक्रमी सेवक असता स्वामीनी या मनसुब्याचा हृद्रोग वागवावा असा प्रकार नाही देशी फौजा आहेत त्या जमा करविल्या आहेत तुम्ही सत्वर निघून येणे

--

७२

इंग्रजीचा तर्जुमा, माल्कम पत्र संग्रह ] [ १६ मे १८१८

## बाजीरावाची शरणागति

**[ खालील पत्र बाजीरावानें धूळकोटाहून माल्कम यास लिहून आपली शरणागति कळविली, तेंच त्याचें शेवटचें राजकारणी कृत्य होय. ]**

माझे अत्यंत जुने दोस्त तीन पैकी कर्नल क्लोझ दिवगत झाले, दुसरे जनरल वेल्स्ली, थोर पुरुष, स्वदेशी युरोपात आहेत, आणि तिसरे आपण आपण आजपर्यंत अनेकाचा साभाळ करून त्यास पदरात घेतले आहे सिंदे होळकर वगैरे सरदारावर मेहेरनजर करून आपण त्याची व्यवस्था लावली आहे तर या संकट समयी मलाही आपण हात देऊन माझा निभाव करावा भगलेल्या होडीतल्या खलाशाप्रमाणे मी आज असाह्य स्थितीत असता मला आपला हा आधार सापडला तो मी कसा सोडूं शकणार ?

७३

**म. रि. उ. वि. ३. पृ. ४७५ ]** [ ११ नोव्हे १८१५

## स्वहस्तानें हुंड्या पाठवाव्या

**[ इंग्रजी भाषा मराठ्यांस येत नसल्यामुळें इंग्रजांच्या हालचालींची बातमी त्यांस बिलेकूल कळत नसे शिवाय इंग्रज आपला पत्रव्यवहार सांकेतिक परिभाषेने करीत, तो संकेत बाहेर कोणास ठाऊक नसे. मराठ्यांच्या पत्रांतही असा कांहीं अल्प संकेत प्रसंगानुसार वापरलेला आढळतो. त्याचें खालील एक उदाहरण भालेराव संग्रहांतून मासल्याकरितां दिलें आहे. पत्र सरदारांनीं बाजीराव पेशव्यास सावकारी भाषेत लिहिलेले आहे. ]**

ही पेढी खरे म्हटले तर विठोबा नाइकाचीच[१] आहे, आणि जरूर लागेल तेव्हा ते ज्या हुंड्या करतील त्या आमच्या कडून स्वीकारण्यात विलंब होणार नाही पण तुमच्या पेढीत ऐवज शिल्लकच नसेल तर तूर्त सावकाराची तरी समजूत काढावी काही दिवस विठोबा नाइकानी तीर्थयात्रेच्या निमित्ताने बाहेर पडावे आणि स्वहस्ताने हुंड्या पाठवाव्या म्हणजे ज्या ज्या ठिकाणी ऐवजाची जरूर पडेल त्या त्या ठिकाणी तो बिनतक्रार इकडून पाठविण्यात येईल.

---

[१] बाजीरावाचा हुजऱ्या विठोबा नाईक शिंदे होळकरादि सरदाराकडे फौजेची याचन करण्यास पाठविलेला होता तोच बाजीरावाचा प्रतीक ऐवज म्हणजे फौज, पेढ्या म्हणजे सरदार. स्वहस्तानें हुंड्या पाठवाव्या म्हणजे बाजीरावानें स्वतः युद्धास पुढें व्हावें. सावकार म्हणजे इंग्रज.

७४

**ऐ. टि. भा. २ ले. २२ ]** [ सेप्टेंबर १८१९

# सतीची बंदी

**[ सती जाण्याची अमानुष चाल बंद करण्यासाठीं इंग्रजांनीं प्रयत्न कसे केले व शास्त्री मंडळींची सभा भरवून समजूत पाडण्यासाठीं इंग्रज अधिकारी किती आग्रही युक्तिवाद करीत होते ते पुढील लेखांत व्यक्त होतें. ]**

श्री

वेदशास्त्रसपन्न समस्तशास्त्री याचे मजलसीत—क्याप्टन हेनरी डडास रॉबर्टसन साहेब बहादूर म्याजिस्ट्रेट सुभा पुणे याचे बोलणे की —

जी सती भाद्रपद वद्य ८ शनिवारी गेली, त्या सतीचे हाल झाले ते हाल ह्या मजलसींत जितके आहेत त्यानी पाहिले असते, तरी त्याचे मनात येते की, असे पुन्हा कोणासही होऊं नये येविषयी अम्हास मदत करते त्यास हल्लीं आमचे दिलात येते कीं, सती जावयाचा दस्तुर फार खराब , आणि तुमचे शास्त्रात असे लिहिले नाही, गेल्यास काही चिता नाही, इतकेंच मात्र आहे ऐसियास ही गोष्ट पुन्हा होऊ नये यास्तव शास्त्रात जी रीत लिहिली आहे, की सती मुकरर जावी असेही नाही त्या रीतीने जावे

हल्ली शास्त्राची उलट रीत करून जातात त्यास आम्ही गैर रीतीने जाऊ देणार नाही याजकरिता येविशी आम्ही सरकारात लिहून बदोबस्त करूं यात तुम्हास वाईट लागू नये तुमचे मनात येईल की, सरकार मना करूं लागल्यास निरुपाय त्यास येविशी सरकार बदोबस्त करूं लागल्यास, त्यास का अवघड नाही ? परंतु सरकार असें मनात आणिते की, ज्या जातीचा जो धर्म आहे, तो मना करण्याचे कारण नाही. परतु सती जाते, तिचे असे हाल होतात हे काही चागले नाही. हल्ली या मजलसीत वृद्ध आहेत, त्याच्याही दिलात आले असेल कीं, ऐसा दुर्लौकिक होतो, त्यापेक्षा बंद जाहल्यास बहुत चागले, ऐसे आलें असेल. ऐसीयास या गोष्टीचा बंदोबस्त सरकारातून जाहल्यास आम्हास काही वाईट लागणार नाहीं, ऐसी सल्ला तुम्हीं सगळयानी दिल्यास तुमची अब्रू सारे हिदुस्थानात बहुत होईल, आणि ब्राह्मणधर्म वरकड सारे गोष्टींत दयाधर्म आहे, आणि सती जाण्याविषयीच मात्र बहुत सक्ति आहे, ऐसें इतर जातीचे

लोक याचे दिलात येते; आणि तुमचे शास्त्रात असे लिहिले नाही की, सती गेली नाहीं तरी तिची बेअब्रू आहे व बेदस्तुर होतो असेही नाही, व हल्लीं लोकातही सती गेली नाही तरी तिची अब्रू गेली असे कोणी बोलत नाही

असे असता हल्लीं बायको सती जाते याची सबब तीन प्रकारची आहे एक, त्या बायकोचा भ्रतार मृत्यु पावतो, ते वेळेस त्या स्त्रीस अत्यंत दुःख होऊन तिचा दिल बहुत कठिण होऊन ती जात्ये. व दुसरी सबब कीं, घरामध्यें स्त्रीचा भ्रतार नित्य म्हणत असतो की, माझी मातुश्री सती गेली, तिची बहुत अब्रू आणि लौकिक फार चागला जाला, असे म्हणत असतो तेणे करून त्या स्त्रीच्या मनात येते की, कदाचित् मी अशीच गेले, तरी माझाही असाच लौकिक व अब्रू फार होईल. असे चित्तात येऊन ती सती जाते तिसरी सबब की, आपला पति मृत्यु पावला, आता आपणास काहीं आधार नाही, सती जावे तरी धैर्य नाही. परंतु चिंता नाही. माडव अथवा खोप करून वरती लाकडे बहुत घालतात. तो माडव तोडल्यानंतर जीव काही रहावयाचा नाही, व कदाचित् मन फिरल्यास बाहेर निघूं सकत नाही मग काही तरी होवो ऐशा तीन सबबेने बायका आपला दिल सक्त करून जातात.

ऐसीयास सती जातेवेळेस तिजला माडव करून त्याजवर फार लाकडे मोठमोठी घालून, तो माडव तिच्या अगावर एकदा तोडून पाडावा, असे तुमचे कोणतेही शास्त्रात निघणार नाही शास्त्रात इतकेच की, तृणाची पर्णकुटिका करून त्यात प्रवेश करावा असे असेल आणि कदाचित् त्यातून बाहेर निघाली असता, त्यास थोडे प्रायश्चित्त देऊन पुन्हा शुद्ध करून जातीत घ्यावी असेही शास्त्रात आहे हल्लीं राधाबाई सती गेली, तिने आपले पतीचे लोभाने त्याजबरोबर सती जावे म्हणून निश्चयेकरून सती गेली ते वेळेस आपल्या हाताने आत जाऊन अग्नि लावून घेतला. तेव्हा अग्निज्वाळा अंगास लागूं लागल्या ती आच सोसावेना, सबब बाहेर निघाली ते वेळेस तिने पुन्हा हिमत बाधून पुन्हा त्या अग्नीजवळ आली, परतु आत जाण्याची हिमत जाहली नाही असे समजून त्या बाईचे दीर जवळ होते, त्यानी तिला जबरदस्तीने पुनः आत टाकली त्यास तुमचे शास्त्रात असे काही लिहिले नाही की, सती बाहेर निघाली तरी पुन्हा जबरदस्तीने टाकावी. असे नसता ते केलें हे शास्त्राच्या उलट होते.

याजकरिता आमच्या दिलात असे मुकरर येते की, हा दस्तुर बहुत खराब आहे. तेव्हा अशी गोष्ट पुन्हा होऊं नये, व आम्हास मंजूर आहे की अशी

खराब चाल पुन्हा होऊ देऊं नये यास्तव पुन्हा आम्ही असे होऊं देणार नाही राधाबाईस तिचे दिराने अग्नीत लोटल्यावर पुन्हाही निघाली. ते वेळेस तिचे हाल असे झाले की, तिचे अंगाची कातडी जळून, मासाचे गोळे बाहेर निघून पायातूनहि रक्त चालले. हे तुमचे पाहिल्यात आले असते, तरी तुमचेही दिलात येते की, ब्राह्मणाचा दयाधर्म आहे, त्याचा हा फार उलटा प्रकार होतो. असे समजून तेच वेळेस तुम्ही सर्वत्रानी म्हटले असते की, हे झाले असे कदापि होऊं नये आता हल्ली जे मजलसीत बसले आहेत, त्यानी तिचे हाल पाहून व ऐकून दिलात आणीत असतील की, जर करिता आपली बायको, तिची माया आपल्या-वर जरी बहुत आहे, तत्रापि मुलालेकराची आई ती, असे हाल करून घेऊन सती जावयाची हिमत तिला होईल असे क्षणभर देखील कोणाचे दिलात येणार नाही. राधाबाईस जळते वेळेस तिजला हिम्मत झाली, तशी हिम्मत या पाठीमागे कोणासही जाहली नसेल व पुढेही कोणास होणार नाही. कारण की, अर्धी जळाली असता पुन्हा अग्नीजवळ कापत कापत आली यास हल्ली या मजलसीत कोण शक्स आहे की इतकी हिम्मत करूं शकेल?

साराश हाच की, शास्त्रामध्ये सती मुकरर जावी असे निघणार नाही, व सती जाऊन माघारी पुन्हा निघाली असता, तिजला जबरदस्तीने आत टाकून द्यावी अगर तोडून टाकावी असें नाही तुम्ही म्हणाल की, शास्त्र नाही परतु आचार बहुत दिवसी आहे, की पुन्हा माघारी निघू देऊ नये त्यास हा आचार बहुत खराब आहे. कारण की, तुमचे शास्त्रात दुसरे आचार किती सागितले आहेत? ते आचार हल्ली सोडून देऊन मनस्वी अनाचार करितात, त्यास कोणी पाहात नाही, व त्याचा बंदोबस्त करावा याविषयीं फिकीर कोणीही करीत नाही, व सतीविषयी शास्त्रार्थ असता त्याप्रमाणे वहिवाट करीत नाही दुसरे, सती गेल्याने स्वर्गप्राप्ति आहे, असे शास्त्रात लिहिले आहे, असें तुम्ही म्हणाल, तरी निश्चयेंकरून जी जाते आणि इमान शाबूत राखते ती स्वर्गास जाते परंतु अशी कोणी नाही की, अग्निस्पर्श अंगास जाहलियावर, तेच इमान शाबूत राहाते असे नाही. तेव्हा अग्निस्पर्शसमयी बुद्धीस भ्रंश होऊन, नतर इहलोकही नाही व परलोकही नाही असें होतें ऐशीयास कोणतेही माणसाचे दिलात नाही की, आपले खुशीने अग्नीत ठरून जळून घ्यावें. असें कदापि कोणतेही काळी घडणार नाही. कोणतेही दयावंत माणसास जळण्याचें दुःख खुद्दास अनुभव आल्याशिवाय विचार करूं शकत नाहीं. एशियास तुमचे दिलात या गोष्टीचा विचार काय आला असेल ?

आम्हावर मेहरबानी करून, तुम्ही सर्वांनी मिळून असा बंदोबस्त करावा की, अशी गोष्ट पुन्हा आमचे दृष्टीस पडूं नये त्या बायकोस पुन्हा ज्याने टाकिली, त्यास दया आहे असें कोणी बोलणार नाही, व शास्त्रातही टाकावी असे नाही त्यास ज्या शकसानें हे काम केलें, त्यास मुकरर सजा व्हावी, व आम्हास मंजूर आहे की त्यास सजा द्यावी शास्त्रकर्ते मोठमोठे होऊन गेले, त्यास बहुत दया होती त्यानी सर्व गोष्टीचा विचार करून, त्यात असा बंदोबस्त केला असेल की, सतीच्या मनात बाहेर निघावयाचे जाहल्यास तिला बाहेर निघण्याविषयी फुरसत असावी कारण की, जिचे इमान शाबूत राहत नाही, तिने बाहेर निघावे हे चागले. असे जाणून तृणाच्या पर्णकुटिकेचा कायदा त्यानी केला परंतु तुम्ही आता शास्त्राची आज्ञा उलट करून आपले मगरुरीने दया सोडून देऊन त्या सतीस मारता त्यास तुमचे शास्त्रात असेही आहे कीं, सती बाहेर निघाली असता, तिला जो वाचवील त्यास बहुत पुण्य आहे हा शास्त्रार्थ तुम्हास माहित आहे काय ? आम्हास ठाऊक नाही व आम्हास मंजूर नाही की, आम्ही तुम्हास समजवावे परंतु आम्हास मुनासब आहे की, हा खराब दस्तूर मना केल्याने तुमचे शास्त्राचे उलट होत नाही तेव्हा आम्ही ही गोष्ट होऊं देणार नाही. पण तुम्ही क्षमावंत आहा, आणि साऱ्याचे दिलातही आहे की हा दस्तुर बहुत खराब आहे, हा मोडावा. परंतु तुम्हास या गोष्टीची शरम आहे याजकरिता तुम्ही आमची अर्जी ऐकून घेऊन, हा दस्तुर खराब आहे, हा मोडल्यास आम्हास वाईट लागणार नाहीं अशी खातरी करावी म्हणजे येविषयीचे बंदोबस्ताविषयी सरकारात लिहून पाठवूं. अशी खातरी तुम्ही केलीयास तुमची अब्रू, दया व धर्माविषयी फार होईल परंतु सती कोणतेही तऱ्हेनें न जावी याविषयीची खातरी करणेही तुमचे मर्जीची गोष्ट आहे आता इतके तुम्ही समजावे की, आजपासून जी सती जाणार, तिने शास्त्राचा जो कायदा तृणाची पर्णकुटिका करून जावें असे आहे, त्याप्रमाणे जावे. तें न होता शास्त्राच्या उलट होऊं लागल्यास आम्ही होऊं देणार नाहीं कदाचित् शास्त्रमार्गाप्रमाणे एकादी सती गेली आणि पुन्हा अग्नीतून बाहेर निघाली, तर तिला जो कोणी जबरदस्ती करून आत टाकील किंवा तोडून टाकील, त्या शकसास आम्ही खुनी असा जाणून, त्याचे पारिपत्य मुनासब आहे त्याप्रमाणे केले जाईल

# रियासतकारांचे ग्रंथ

| | |
|---|---|
| **मुसलमानी रियासत** | **किंमत** |
| भाग १ (स. १००७ – १५२६) | शिल्लक नाहीं |
| भाग २ (स. १५२६ – १८६७) | ,, |
| **मराठी रियासत** | |
| १ शहाजी (स. १५९४ – १६६४) | आठ आणे |
| २ शककर्ता शिवाजी (स. १६२७ – १६८०) | दीड रुपया |
| ३ उग्रप्रकृति संभाजी (स. १६८० – १६८९) | आठ आणे |
| ४ स्थिरबुद्धि राजाराम | बारा आणे |
| ५ बाळाजी विश्वनाथ | एक रुपया |
| ६ पहिला बाजीराव | अडीच रुपये |
| ७ बाळाजीराव नानासाहेब १ | दोन रुपये |
| ८ ,, ,, २ | छापत आहे |
| ९ थोरला माधवराव | |
| १० उत्तरविभाग १ | साडेतीन रुपये |
| ११ ,, २ | ,, |
| १२ ,, ३ | ,, |
| **ब्रिटिश रियासत पूर्वार्ध** (१६०० – १७५७) | ,, |
| **ब्रिटिश रियासत उत्तरार्ध** (१७५७ – १८५८) | ,, |
| New History of the Marathas Vols 1-3 | Rs 40 |
| Main Currents of Maratha History | Rs 5 |
| Shivaji Souvenir [English, Marathi & Gujrati] | Rs 2-8 |
| शिवसंस्मृति | आठ आणे |
| इंग्रजी भाषेची गृहशिक्षा | आठ आणे |
| शालोपयोगी भारतवर्ष | तीन रुपये |
| बालोपयोगी महाराष्ट्राचा इतिहास | चार आणे |
| चित्रमय हिंदी राजवंश | एक रुपया |
| मराठ्यांच्या राज्यकथा | दीड रुपया |

केशव भिकाजी ढवळे, श्रीसमर्थ-सदन, मुंबई ४